# सवयी आणि अभ्यास

यांविषयीं ग्रंथ

विश्वनाथ नारायण मंडलिक

याणी केला.

"उद्योगिनंपु[illegible]षसिंहमुपैतिलक्ष्मी
दैवंम[illegible]तिकापुरुषावदंति ॥
दैवंविहत्यकुरुपौरुषमात्मशक्त्या
यत्नेकृतेयदिनसिध्यतिकोत्रदोषः ॥"

---

# PAPERS ON HABITS AND STUDY

BY

VISHWANATH NARAYAN MANDLIK.

मुंबईमध्यें

टामस ग्रेहाम याणी छापिला.

इ० सन १८५७.

शा० शके १७७९.

# सवयी आणि अभ्यास

यांविषयीं ग्रंथ

## विश्वनाथ नारायण मंडलिक

याणीं केला.

"उद्योगिनंपुरुषसिंहमु[illegible]तिलक्ष्मीर्दैवंप्रधानमितिकापुरुषावदंति ॥
दैवंविहत्यकुरुपौरुष[illegible]शक्त्यायत्नेकृतेयदिनसिध्यतिकोत्रदोषः ॥

---

PAPERS ON HABITS AND STUDY

V[illegible] MANDLIK.

---

मुंबईमध्यें

टामस ग्रेहाम याणीं छापिला.

इ० सन १८५७.

TO

# COLONEL G. LEGRAND JACOB,

POLITICAL AGENT IN KUTCH,

AND

POLITICAL COMMISSIONER FOR KOLHAPOOR AND SAWANTWAREE

THIS HUMBLE ATTEMPT AT NATIVE IMPROVEMENT

**IS DEDICATED**

WITH FEELINGS OF SINCERE GRATITUDE

AND PROFOUND RESPECT

HIS MUCH OBLIGED SERVANT

मेहेरबान कर्नल जी. लिग्रांड जेकब,

पोलिटिकल एजंट, प्रांत कच्छ

आणि

पोलिटिकल कमिशनर, प्रांत कोल्हापूर व सावंतवाडी,

यांस

हा एतद्देशीय लोकसुधारणेचा लहानसा उपाय,

अंतःकरणपूर्वक कृतज्ञतेने परम विनयपूर्वक

त्यांचा जो अत्यंत आभारी सेवक,

हा ग्रंथकार, त्याणे

नजर केला असे.

# उपोद्घात.

पुढील ग्रंथाकडे लोकानी लक्ष द्यावें याविषयीं सर्वांजवळ ग्रंथकर्त्ता एवढ्या धाष्टर्याने कां मागणें करितो, असा सहजच कोणी प्रश्न करील. तर त्याचें उत्तर असें आहे, कीं अमेरिका खंडांतील डाक्टर जान टाड्ड याणी केलेल्या "विद्यार्थि-मार्गदर्शक" या ग्रथाचा संक्षेपावरून कांहीं, आणि कांहीं अन्यस्थलीं संपादिलेले ज्ञानाचे सहायाने मराठीमध्यें "स्वकल्याणाचा उपाय" ह्मणून एक ग्रंथ तयार होत आहे. त्यांत प्रथम सवयींविषयीं आणि दुसरें अभ्यासाविषयीं, हीं व्याख्यानें, त्याचे दोन भाग आहेत. या भागांस बुद्धिपुरःसर व्याख्यानिक आकार देऊन, प्रथमचा तारीख २८ सेपटेंबर सन १८६८ रोजीं मराठी-ज्ञानप्रसारक सभेंत वाचिला, आणि दुसरा चालत्या महिन्याचे ८ वे तारिखेस वाचिला. तेव्हां हीं व्याख्यानरूप पत्रें प्रसिद्ध केल्याने एतद्देशीय लोकांस अभ्यासादिकांचा चांगल्या सवयी लावून लोकशिक्षणास सहायभूत होतील, असें एतद्देशीय लोकसुधारणेचे कांहीं मित्रांस वाटून, त्याणी सांप्रत एवढेच भाग निराळे, अशा अपूर्ण स्थितींत छापण्याविषयीं ग्रंथकर्त्यास अति आग्रह केला. तेव्हां ही त्यांची इच्छा पूर्ण होऊ, अशी

आशा ठेवून तसें करण्यास त्याणे अनुमोदन दिलें. हा ग्रंथ निदान एक तरी पुरुषास जर चांगल्या सवयी लावण्यास कारणीभूत होईल, तर या ग्रंथकाराचे सर्व श्रम हरतील.

तारीख १४ आक्टोबर, सन १८५७. मुंबई.

*Translation of the Above.*

It will naturally be asked, why the author o the following pages has had the boldness t challenge the attention of the public. It may therefore be explained, that these papers form par of a work in Maràthí, entitled "The way to Sel Improvement" which is being prepared partly b adaptations of portions from an English abridge- ment of the "*Student's Guide* by the Rev Dr. John Todd of America," and partly fron knowledge derived from other sources. The were purposely put into their present form, and th first was read before the *Maràthi Dnyánprasára Sabhá* on the 25th September 1856, and th second on the 9th instant. Some friends of Na tive improvement thinking that their publicatio would assist in educating the Natives by LEADIN THEM TO FORM PROPER HABITS OF STUDY, &c., hav pressed the author to submit them in their presen isolated, and necessarily imperfect form; and h has consented to do so in the sincere hope tha their anticipations may be realized. Should thes pages be the means of instilling correct habits i one human breast, the labors of the author wil be amply rewarded.

*Bombay*
15*th October* 1857.

# सवयींविषयीं.

**सभासदहो,**

मागील सभेचा दिवशीं मी सवयी या विषयावर कांहीं माझे स्वानुभवजन्य व कांहीं ग्रंथांतरीं पाहिलेले विचार एकत्र करून या सभेस विदीत करीन असें बोलिलों होतों; त्यावेळचा अध्यक्षानीं या निबंधाचा भावी रूपाविषयीं जें वर्णन केलें, त्यावरून कदाचित् या निबंध रचनेचा योग्यतेविषयीं जी अपेक्षा *उत्पन्न झाली असेल, तिची परिपूर्णता होण्याजोगा हा निबंध होणार नाहीं असें मला वाटतें. कारण कीं जरी विषय सुरस असला, तरी उत्कृष्ट प्रतिपादक पाहिजे, आणि त्याला वेळ पाहिजे. या दोन्ही गोष्टींची सांप्रतचा प्रसंगीं उणीव आहे, हें पुर्तेपणें समजून, यथामति जे विचार सुचले, ते तुह्मास नजर करितों.

प्रथम हा निबंध करण्याचा उद्देश सांगणें हें विहित आहे. सांप्रतचें सरकार लोकहिताकरितां या देशांत नानाप्रकारचा कला विद्या लोकांस शिकविण्याविषयीं यत्न करीत आहे. असें हिंदुस्तानामध्यें कधींहि कोणत्या प्रभूनें केलें असें आढळत नाहीं. वरिल गोष्टीस फारसें प्रमाण देण्यास इतिहासांतरीं पाहावयास जावें तर मुळींच प्राचीन काळचे इतिहासरूप ग्रंथच मिळत नाहींत ही एक गोष्ट दुर्दैवाचीच आहे. जे पुराणादि प्राचीन ग्रंथ आ-

---

*टीप—या निबंधाचा शेवटील भागांतील मजकूर सभेपुढें संक्षेप सांगितला होता त्याचें एथें समग्र विवेचन केलें आहे.

हेत, त्यांमध्यें प्रथम तर बहुधा काल निर्देश नाहीं, आणि जें वर्णन आहे, तें रूपकादि अलंकारांत इतकें लपेटलें आहे, कीं त्यांतील सत्यमिथ्या विषयांचा निर्णय करायास बराच काळ लागून शेवटींहि यथास्थित होईल असें माझाने ह्मणवत नाहीं. आतां जरी कालनिर्णय न झाला, तरी मला वाटतें कीं जे प्राचीन ग्रंथ या देशीं सांप्रत उपलब्ध आहेत, तसेच जे अन्य देशीय लोकानी प्राचीन काळीं **भरतखंडांत** येऊन एथील लोकांविषयीं आपआपल्या देशीं लेख ठेविले आहेत, दुसरें जे अर्वाचीन **एल्फिन्स्टनादि इंग्लश** इतिहास कर्त्ते याणीं बहुत शोधकरून या देशांतील प्राचीन लोकांविषयीं ग्रंथ रचिले आहेत, तसेच जे मागील लोकांचें विद्या चातुर्य आणि कला कौशल्य यांचे अणुरेणु सांप्रत लोकांत दृष्टिगोचर होतात, या सर्वांवरून असें सिद्ध होतें कीं त्या वेळचे हिंदूलोक मोठे उद्योगी असावे, आणि त्यावेळचा सर्व देशांतील लोकांत यांची बढती असावी.

याप्रमाणें त्यांची दिवसें दिवस ऊर्जित दशा यात्री, तें एकीकडे राहून, उलटी उतरती कळा कां होत आली? हा सहजच प्रश्न उत्पन्न होतो. तर हा विषय समग्र कथन करण्यास फार मोठा आहे, आणि यावर कोणी योग्य विद्वान् ग्रंथहि लिहूं शकेल; परंतु एथें थोडक्यांत सांगतों, कीं मूळ आपल्या लोकांची उतरती कळा येण्यास कारण या देशामध्यें सत्य व उद्योग यांचा अनादर होत चालला. त्यामध्यें सत्य या विषयावर या सभेमध्यें पूर्वीं निबंध वाचलागेला आहे असें मला स्मरतें. सर्व व्यापाराचा मूळ पाया सत्य असावा हें कोणीहि कबूल करील. आतां दुसरें उ-

र्जित दशेचें आदिकारण उद्योग आहे. कोणी असें ह्म-णेल, कीं आपले लोक उद्योग करीत नाहींत काय? तर त्यांस माझें विनयपूर्वक उत्तर इतकेंच आहे कीं बहुधा पोटापुरताच मात्र उद्योग करितात; आणि बाकी काळ व्यर्थ घालवितात. तो कोणत्या रीतीने घालवितात याहिविषयीं एक निबंध लिहितां येईल, परंतु या समाजांतील गृहस्थांस बहुधा आपल्या लोकांची काल क्रमण्याची पद्धति माहीत असेलच आणि थोडी पुढील निबंधांतहि येईल.

"आहारनिद्राभयमैथुनंचसामान्यमेतत्पशुभिर्नराणां"
"ज्ञानंहिमेपामधिकोविशेषोज्ञानेनहीनाःपशुभिःसमानाः"

या श्लोकाचा पूर्व चरणामधीलच बहुधा क्रियांमध्यें आमचा लोकांचा उद्योगाचें पर्यवसान होतें. आणि तो उद्योगहि मनस्वी व अनियमित होतो. तेणेंकरून अर्थात यांची प्रवृत्तिमार्गाचीहि सिद्धि होत नाहीं. मग मनुष्याचा उत्पत्तीचा हेतु काय असावा; आपलें कर्त्तव्याकर्त्तव्य काय असावें; आपल्या सारिख्या उच्चस्थितीचा प्राण्याने ईश्वराचा अगाध कृत्यांचा शोध लावण्याचा यत्न करून, प्रकृतीचे असंख्य सृष्ट्यंतर्गत व्यापार यांचे नियमांचे उद्घाटणानें मनास आनंदित करून, त्यांपासून होणारीं जीं कार्यें त्यांहीं लोकोपकार करण्यास प्रवर्त्तणें याविषयीं बहुतांचा हातून कांहींच होत नाहीं असें ह्मटलें असतां चालेल. सांप्रतचा राज्य कर्त्यांचा क्रम एतद्विपरीत आहे. त्यांचा नियामक सतत उद्योग पाहिला असतां त्यांचे सांप्रतचे ऊर्जित दशेचा पिता ह्मटला असतां कांहीं चिंता नाहीं. मी थोड्या प्रत्यक्षानुभवावरून सांगतों, कीं वरील सर्व कृत्यांकडे या लोकांचा व्यक्त्यनुरोधें सतत उद्योग चालला आहे. हा

त्यांचा श्रेष्टत्वाचें कारण, आणि त्याचें शून्यत्व हें आमचा नाशाचें कारण. तर अशी उद्योगाची प्रवृत्ति होण्यास आंमचा लोकांचा सवयी बदलल्या पाहिजेत. यांना उद्योगाची गोडी लागून हे नियामक उद्योगी होतील असें झालें पाहिजे. अशा सवयी त्या कोणत्या हें एका इंग्लिश ग्रंथाधारें मी यथामति वर्णन करितों. मी सवयीं वर इतकें प्राबल्य कां ठेवितों हें पुढील विवरणावरून स्पष्ट होईल.

मनुष्य हा एक सवयींचा जुडका आहे असें ह्मटलें असतां चालेल. कारण मनुष्याची स्थिति त्याचा सवयीनुसार असत्ये. जर कोणा मनुष्याचा पायांत जन्मपर्यंत बिडी घातली, तर त्याला तिजपासून सतत क्षणक्षणीं किती दुःख होईल. प्रातःकाळीं उठतो तंव पायांत बिडी आहे. दिवसभर कष्ट करून रात्रौ विश्रांतीचा समयीं पाहातो तंवहि आहे. असें झालें असतां, त्या मनुष्याला किती बरें कष्ट व्हावे? आणि असें दुःख आमरणांत भोगणें आहे, असें जेव्हां त्याचे चित्तीं येईल तेव्हां त्याला किती बरें क्लेश होतील! अशा बिडीचीहि पीडा सोसवेल, व अशा बिड्या कदाचित् तोडूनहि टाकितां येतील; परंतु मनुष्यांस जा नाना प्रकारचा सवयी लागतात त्या सहन करणें अथवा त्यांचें निरसन करणें हें मोठें दुर्घट कृत्य आहे.

सवयी सहज लागून जातात आणि त्यांतून जा वाईट असतात त्या तर मुख्यत्वें करून लवकर जडतात. सवय ही प्रथम लागत्ये वेळीं हलकी वाटो, परंतु सहवासानें ती तकी दृढ होय्ये कीं मग जसा गलबताचा नांगराचा शेडा त्यास हालूं देत नाहीं, तद्वत् ती सवय मनुष्यास बद्ध करित्ये. तो शेडा प्रथम तंतुरूप असतो, परंतु त्याशीं

दुसरे तंतु एक एक असे मिळविल्याने शेवटीं मोठ्या जहाजासहि तो भारी होतो. याचप्रमाणें सवयींची व्यवस्था आहे.

प्रत्येक मनुष्यास कांहीं तरी प्रकारचा सवयी तरुणपणीं लागतील. त्याचा वेळ, त्याचा उद्योग, त्याचे विचार, आणि त्याचा मनोवृत्ति, यांचा एक प्रकारचा क्रम असेल. सवयी ह्याबऱ्या असोत किंवा वाईट असोत, एकदा लागल्या ह्मणजे त्या केवळ मनुष्याशीं भिनून जातात, आणि त्याचा प्रकृतिरूप होतात. बहुधा सर्व चाळिशींत आलेल्या पुरुषांची स्थिति पाहिली असतां दृष्टीस पडेल, कीं त्यांला कांहीं अशा सवयी लागल्या आहेत, कीं जांपासून त्यांची उपयुक्तता कमी होऊन त्यांस दुःख होतें परंतु त्या इतक्या त्यांचा केवळ जीविताशीं निकट सलग्न झाल्या आहेत, कीं त्यांचाने त्यांचा पाश तुटत नाहीं; आणि बहुत करून तोडण्यास त्यांला धीर होत नाहीं. मी अशी अपेक्षा करितों कीं तुह्मी सवयी पाडून घ्याल. कारण जाचा नित्यशः सद्यःपक्ष सवयी होतात, जास आपल्या आंगच्या सवयी नाहींत, असा जो पुरुष तो दैवहीनच समजावा. या करितां तुह्मी सवयी पाडून घ्याल असें मी इच्छितों, परंतु अशा सवयी पाडा, कीं जा सरलगामी आहेत आणि जांपासून नित्यशः मुहूर्त मुहूर्तास तुमचें सौख्य व तुमची उपयुक्तता हीं वृद्धोप्रत पावतील. जर एका मनुष्यास एक वस्त्रांचें भांडार दाखविलें आणि सांगितलें, कीं यांतून तुला पाहिजे तो पोषाग पसंत कर, तो तुला जन्मवर नेसावा लागेल; तर तो मनुष्य उंच जातीचा व टिकाऊ असा पोषाग शोधून काढणार नाहीं काय? अ-

शा गोष्टीं मध्यें तारतम्य शक्तीचा उपयोग करणें हें जर त्या पुरुषास आवश्यक कृत्य आहे, तर मग या जीवास जा सवयींनी आमरणांत वर्त्तावें लागेल अशा सवयींची चांगली निवड करणें हें मनुष्याचें त्याहून अनंतपट मोठें कृत्य नव्हे काय? जसें शरीरास तंग पोषाग घालून, मग त्याचानें आपलीं कर्में सुलभ रीतीनें आणि त्वरित करवतील अशी अपेक्षा करणें निरर्थक आहे, तसें कांहीं कांहीं क्षांदिष्ट लोकांसारिख्या जीवास सवयी लावून घेऊन, मग या प्राण्याचा हातून चांगलें अथवा मोठें कर्म घडेल असें इच्छिणें हेंहि निरर्थक आहे. कोणतीहि सवय जी पाडून घेण्या जोगी आहे, ती कशी पडेल याविषयीं भीति बाळगूं नका. कारण कोणतीहि सवय पडूं शकेल आणि प्रथम तुह्माला वाटतें त्याहून थोड्या श्रमानें पडेल. एकच गोष्ट किंवा एकच काम प्रत्यहीं एकाच वेळीं करण्याचा पाठ ठेवा, ह्मणजे तेंच काम तुह्माला करण्याचें गोड लागेल. जरी प्रथम कडु वाटलें तरी चिंता नाहीं. कितीहि कडु असलें, तथापि तेंच काम त्याच वेळीं प्रत्यहीं करा. असा कांहीं काळपर्यंत अव्याहत क्रम चालला ह्मणजे तेंच काम तुह्माला शुद्ध आनंदरूप होईल. याचप्रमाणें आपल्या सर्व सवयी पडतात. जा विद्यार्थ्यास आतां सतत दहा तास प्रतिदिनीं सहज अभ्यास करितां येतो त्याप्रमाणें जर एकादा मजूर अथवा जास शारीर श्रम करण्याची सवय आहे तो करूं लागेल, तर त्याचानें तें सहन होणार नाहीं. एक ग्रंथकार असें लिहितो, कीं म्या एका समाजांत एक श्रीमान् गृहस्थ पाहिला त्याला पूर्वी मोठीं पक्वान्नें आवडत असत; परंतु त्या दिवशीं पाहिलें, तंव बाजरीची भाकर

आणि साधी भाजी इतकेंच जेवून तो स्वस्थ झाला आणि त्याचा मनांत पक्वान्न खाण्याचें येईना. त्याचे कारणाचा शोध करितां, असें समजलें कीं कांहीं रोगामुळें ह्याला असें पथ्य करावें लागत असे. तो क्रम इतके दिवस चालला, कीं मग त्यास त्याच खाण्याची गोडी लागली. आतां माझा मतें जासवयी तुह्मास लागाव्या त्या खालीं सांगतों. आणि त्या सवयी कशा पाडाव्या हेंहि सांगण्याविषयीं यत्न करितों.

**प्रत्येक दिवशीं काय करायाचें त्याचा पूर्वी संकेत करून ठेवा.**

हा संकेत पूर्व दिवशीं सायंकाळीं करून लिहून ठेवावा. नंतर प्रातःकाळीं उठून पुनः अवलोकन करावा आणि तत्क्षणींच त्याप्रमाणें वर्तू लागावें. याप्रमाणें पूर्वी स्पष्ट संकेत करून काम करूं लागलें असतां एक दिवसांत किती काम होतें याचा जो अनुभव घेईल त्यास आश्चर्यच वाटेल. आयुष्य तरी किती दिवसांचें आहे! पूर्वी संकेत करून एक दिवसांत जें काम होतें, तें संकेता विरहित दोन दिवसांनीहि होत नाहीं, आणि संकेत रहित काम केल्यानें आपण काय केलें तें आपल्यासच समजत नाहीं. हें माझा अनुभवास आलें आहे. जो आपलें काम करण्याचा बेत ठेवील, त्याचें काम उत्कृष्ट रीतीनें चालेल. याचा प्रत्यय कोणासहि अनुभवा अंतीं येईल.

अशा क्रमाने चालणारा मनुष्य लब्धी फेंकणारा होणार नाहीं; कारण जा नदीचा प्रचंड प्रवाह महा सागरास मिळण्यास जात असतो ती जशी आपल्या पात्रा बाहेर न जातां स्तब्ध चालत असत्ये, त्याप्रमाणें त्या पुरुषांचें वर्त्तन होतें. जर सांप्रत तुमचा शाळेंत अभ्यास चालला असेल,

तर तत्संबंधी कृत्यांचा क्रम तुमचे गुरु घालून देतील; तीं कृत्यें तुमचा नेहमींचा संकेतांत आलीं पाहिजेतच. परंतु त्या शिवाय कांहीं नवीन माहिती करून घेण्यास, अथवा जुनें खचीत करण्यास अथवा आपले इष्ट व स्नेही यांची सौख्यवृद्धि करण्यासाठीं कांहीं तरी तुह्मी केलें पाहिजे.

प्रथम जितकें सांकेतिक लिहून ठेविलें असेल, तितकें आपल्या हातून न झालें ह्मणून तुह्मी निराश व्हाल परंतु जसे जसा हा तुमचा क्रम चालेल, तसतसें तुमचें काम अधिकाधिक होत जाईल आणि मग आपले हातून किती काम होतें हें पाहून, तुह्मीच चकित होऊन जाल. या सवयीची आपल्या लोकांस जरूर आहे कारण यांचा कोणतेंच करण्याचा बेत नसतो. तसें झाल्याने प्रातःकाळापासून सायंकाळपर्यंत यांचें काम संपतच नाहीं यांस तर वाटत असतें कीं आज आह्मी इतकें काम केलें, कीं कृतकृत्य झालों परंतु पाहूं गेलें तर कांहींच झालें नसतें. अगदीं प्राकृत ह्मण आहे कीं "दिवस गेला रेंटी, मग दिव्यांत कापूस वेंटी"-- तात्पर्य, स्वतः पुष्कळ श्रम घेऊनहि अव्यवस्थेमुळें तादृश फलप्राप्ति होत नाहीं. ही अव्यवस्था आपल्या लोकांचा नाशाचें एक कारण आहे.

आतां दुसरी सवय कोणती तर,

२ **सतत श्रमकरणें.**

जर दुर्दैवेंकरून तुह्माला वाटत असेल, कीं आह्मी अचानक बुद्धिवान् आहों आणि सर्व वस्तु आह्माला आपोआपच येतील, तर असा समज घालवून लवकर उमजाल तर बरें. असें मनीं निश्चित बाणूं द्या, कीं जें कांहीं मिळवायाचें

तें उद्योग खर्चून घेतलें पाहिजे; याकरितां या द्रव्याचा एकदम भरणा करूं लागा. क्षुल्लक धंद्यामध्यें तत्परतेने चाललें असतां, पुढें मोठीं उलीं ढाली करण्यास मार्ग होतो. नुसत्या उद्योगाने काय होऊं शकतें, हें पाहून वास्तविक अद्भुत वाटतें. प्राचीन काळचे लोक मोठे मोठे ग्रंथ लिहीत, तें पाहून आपण आश्चर्यचकित होतों; परंतु त्या सर्वांची किल्ली उद्योग आहे; याणे सर्व संशयकपाटें उघडतात. जो पुरुष प्रत्यहीं तीन तास जोराने चालेल तो सात वर्षांनी भूगोलाचा परिघा इतका पंथ क्रमील. निरुद्योगीपणा अवलंबन करणें यासारिखी दुसरी कोणतीहि वाईट स्थिति नाहीं; आणि या सवयी सारिखी दुःखकारक दुसरी सवयहि नाहीं. तशांत ही सवय जशी सहज लागून जाये, आणि मोडून मात्र टाकण्यास कठीण, तशी दुसरी कोणतीच सवय नाहीं. निरुद्योगी मनुष्य लवकरच स्तिमित होऊन जातो; त्याचा वृत्ति इंडियन् (अथवा हिंदू ह्मटलें असतांहि चालेल) लोकांसारिख्या होतात, आणि मग तो त्यांचा पुढील ह्मणी प्रमाणें ओघानेच वागूं लागतो. ती अशी "धावण्यापेक्षां चालणें बरें; चालण्यापेक्षां निश्चल उभें राहाणें त्याहून बरें; उभें राहाण्यापेक्षां बसणें बरें; आणि बसण्यापेक्षां पडून राहाणें बरें." मला असें वाटतें कीं जो अतिशय निरुद्योगी तो बहुधा सर्वांहून विशेष दयेस पात्र असावा; कारण वेडापासून काय जें सुख होतें असें ह्मणतात, तें जसें वेड्यासच मात्र कळतें, तशीं निरुद्योगीपणापासून जीं दुःखें उद्भवतात त्यांची निरुद्योग्यांसच मात्र कल्पना करवेल. मला माहित आहे, कीं पुष्कळ लोक अतिशय कामांत गुंतलेले असून उद्योगी नसतात. कारण बहुधा असें घड-

तें कीं ज्याची अतिशय धांदल व गोंगाट असतो, तो उद्योगापासून दूर असतो. सुज्ञ पुरुष या दोहीं स्थितींचें सहज तारतम्य काढतील. जो पुरुष आपलें कर्त्तव्य कर्म व वास्तविक धंदा यांची उपेक्षा करितो, तो आपले मौर्ख्याची स्मृति नपडावी, ह्मणून कांहीं तरी मनास उद्योग लावून देण्याचा सहजच खटपटींत पडतो. आणि आपल्या आचरणाविषयीं आपणास वाईट नवाटावें ह्मणून, जें वास्तविक कर्त्तव्य, तें टाकून भलतेंच करूं लागतो. जो उद्योगी असतो, त्यास वास्तविक पाहिलें असतां अतिशय अवकाश सांपडतो. कारण त्याचा वेळाचे निरनिराळे विभाग केलेले असतात, आणि प्रत्येक भागास कांहीं नियमित कार्य लावून दिलेलें असतें; तें कार्य आटोपलें ह्मणजे याला अवकाश झाला. निरुद्योगी मनुष्यावर सुस्तीचें पटल येतें. मग जसें वादळ गेल्यानंतर समुद्र स्तब्ध होऊन जातो, तद्वत् याची अवस्था होये. मनुष्याचा उद्योगाचें पाणी अगदीं न चाले असें स्तब्ध होण्यापेक्षां, त्याचा ओघ झपाट्याने फुटून बांधावरून इकडे तिकडे वाहून जाईल तर बरें. निवाऱ्यावर महिन्याचे महिने पडून राहाण्यापेक्षां, वादळांतहि गलबत हंकारून वादळ वटावून जाण्याविषयीं कोण इच्छा करणार नाहीं! सेनेका ह्मणून एका युगानी तत्व वेत्त्याने आपले मित्रास पत्र लिहिलें त्यांत तो ह्मणतो, कीं "कांहीं नवीन ग्रंथ रचना केल्याशिवाय अथवा कांहीं चांगला ग्रंथ वाचून त्याचें तात्पर्य काढिल्याशिवाय माझा एकहि दिवस गेला नाहीं." उत्कृष्टता संपादन करण्यास उद्योगच केला पाहिजे. याविषयीं असें प्रसिद्ध मत पडून गेलें आहे, कीं निरुद्योगी ह्मणजे मनस्वी झालेले मूर्ख असें ह्मणतात. जो

पुरुष नियामक उद्योगी नाहीं, त्याचा किती काळ व्यर्थ जातो हें जर सूक्ष्मरीतीने पाहाल, तर तुह्माला आश्चर्य वाटेल.

अभ्यासाविषयीं आणि सवयींविषयीं संकेत करून तत्तुल्य कागदावर काढणें (ह्म० लिहिणें) हें काम सोपें आहे; परंतु ते संकेत कागदाचे कागदावर राहातात इतकेंच कार्यतें कठीण आहे. आणि मग असें होतें कीं ते संकेत एकदम सिद्ध होत नाहींत ह्मणून आपण मुळींच सतत श्रम करण्याचें टाकून देतों. **लूथर*** याणें देशपर्यटन करीत असतां आणि दुसरे धंदे करीत असतां, **बैबल** पुस्तकाचें समग्र भाषांतर केलें हें पाहून सर्व युरोपखंडांतील लोक आश्चर्य करूं लागले; परंतु या सर्वांचें कारण एका शब्दाने कळतें. त्याचा प्रत्यहीं कांहीं तरी करण्याचा दृढ निश्चय असे. आणि जेव्हां त्याला कोणी विचारी कीं त्वां हें भाषांतर कसें केलें? तेव्हां तो उत्तर देई कीं, "कांहीं तरी भाषांतर केल्याशिवाय म्या दिवस जाऊं दिला नाहीं." असें होतां होतां समग्र भाषांतर झालें.

एक **तुर्की** लोकांमध्यें व एक **स्पानियार्ड** लोकांमध्यें अशा दोन ह्मणी आहेत. त्यांत सत्य पुष्कळ आहे. त्यांतून पहिली अशी, "उद्योगी पुरुषाचा पाठीस एकच भूत लागतें; निरुद्योग्याचा मागें हजारों लागतात." दुसरी अशी, "मनुष्यास बहुधा सैतान पाशांत पाडण्यास पाहातो, परंतु **आळशी** मनुष्य निश्चयेंकरून सैतानास पाशांत पाडितो." याजकरितां प्रत्यहीं निश्चयें करून उद्योग करण्याची जर सवय पाडाल तर किती दुष्ट संगति, किती कुकर्म प्रवर्त्तक पाश, किती अब्रूला हानि येण्याचे आणि आपल्या इष्टांस

* हा एक ख्रिस्ती धर्मोपदेशक होता.

असमाधान उत्पन्न करण्याचे प्रसंग; या सर्वांपासून सुटाल?

वर इतके दृष्टांत आले त्या अर्थीं निरुद्योगीपणाच निषेधाविषयीं आणि सतत श्रमाचा सवयीचा ग्रहणाविषयीं दुसरें सांगायास नको. परंतु आपल्या लोकांमध्यें रिकामे बसून निरर्थक वेळ घालविण्याची दृढतम चाल पडून गेली आहे, याकरितां मला एथें सर्वांस विचार करायास प्रार्थिलें पाहिजे. सुजनहो! बहुधा आपल्या लोकांस वेळाच हिशेबच नसतो. वास्तविक पाहूं गेलें असतां वेळासारखी दुसरी अमूल्य संपत्ति नाहीं. असें असतां तारतम्यें करून पाहिली तर क्षुद्र, अशी जी धातुमय संपत्ति, तिचे व्यय करण्याविषयीं परमदक्ष असे जे आपले लोक ते ही कालसंपत्ति किती बेसावधपणें उधळून टाकिताहेत. अर्थात् इतकी संपत्ति व्यर्थ जात आहे, तंववर आपले लोक सुधारून, हा देश संपत्तिवान् होऊन, आपल्या योग्यतेनुसार उच्च स्थितीप्रत पावेल, ही अपेक्षा करणें हें मौर्ख्य आहे आतां सतत उद्योग चालविणें हें भलत्याचाने होऊं शकणार नाहीं. याकरितां तिसरी सवय पाहिजे; ती कोणती तर,

३ **मनोनिग्रह.**

एकच अभ्यास चालविणें, एकच संकेत वर्षानुवर्ष चालविणें, याला मनोनिग्रह ह्मणतात. कांहीं पुरुष असे असतात, कीं त्याणी कोठें ऐकिलें किंवा ग्रंथांतरीं वाचिलें, कीं अशा अशा रीतीने अमुक मनुष्याने उद्योग केला त्याला उत्कृष्ट सिद्धि झाली; ह्मणजे ते असें अनुमान करितात, कीं आपणहि तसें करावें. नंतर विचार न करितां

तसा बेत घालितात आणि हा बेत फार चांगला असें बोलूं-लागतात. कांहीं दिवसां नंतर तो बेत सोडून दुसऱ्या मागें लागतात. यांचा मनांत असें येत असतें कीं अमुक महान पुरुषानें हें कृत्य केलें, तें कृत्य केलें, तेव्हां आह्मी तसें करूं; परंतु कोणतीहि सवय नवी लाविली असतां जशी साहजिक थोडक्या वेळांत दुःसह होये त्याप्रमाणें होऊन ते सोडून देतात. एक अभ्यासी पुरुष होता त्याणे असें ग्रंथांतरीं वाचिलें, कीं एका थोर पुरुषानें आपल्या दरवाजावर "कालो गच्छति जल्पतां प्रतिदिनं," अशीं अक्षरें लिहिलीं होतीं. तें वाचितांच याणें आपल्या दरवाजावर ढवढवित अक्षरानी तसें लिहिविलें. पुनः त्याचा असें वाचण्यांत आलें कीं एक विद्वान् **ब्लाकूस्टन्*** नामक धर्म शास्त्याची वाखाण करीत असे. असें पाहातांच याणे सर्व गोष्टी सोडून **ब्लाकूस्टनकृत** भाष्य विकत घेतलें आणि मोठ्या उत्सुकतेनें वाचूं लागला. इतक्यांत त्याचे कानीं आलें, कीं कोणी नामांकित गृहस्थ संभाषणापासून बहुतेक ज्ञान संपादन करीत असे. असें ज्ञान संपादन होईल याविषयीं बराच संशय आहे. तथापि तसें ऐकतांच **ब्लाकूस्टनकृत** ग्रंथ टाकून इकडे तिकडे मंडळ्यांत जाऊन संभाषणानें ज्ञान मिळविण्याविषयीं तो उद्युक्त झाला. अशा विद्यार्थ्यांनी भरलेली एक शाळा असेल, आणि जर त्या सर्व विद्यार्थ्यांस एकवट करून त्याचा पुतळा बनाविला तर तोहि वास्तविक अभ्यासी होणार नाहीं. ज्या मनुष्यास दोन कर्त्तव्य कर्मांतून कोणतें प्रथम करावें याविषयीं सदोदित शंका येये, त्याचा हातून एकहि कृत्य तडीस जाणार

---

*एक **इंगलिश** विद्वान्.

नाहीं. जो पुरुष कांहीं निश्चय करितो, आणि कोणी खेद्याने त्याविरुद्ध कांहीं सुचविल्याबरोबर तो निश्चय बदलतो; ज्याचीं घटिकेंत मतें बदलतात आणि बेत फिरतात; जो जसजसें तव्यतोचें वारें लागेल त्याप्रमाणें, वातदिग्दर्शक यंत्रासारिखा इकडून तिकडे उलटतो; त्याचा हातून कोणतेंहि मोठें अथवा उपयुक्त काम व्हावयाचें नाहीं. कोणत्याहि कामांत त्याचा पाय पुढें न पडतां, फार झालें तर तो जागच्या जागीं राहील; अथवा बहुधा सर्वांत मागसावेल. जो प्रथम चांगली सलाह घेतो, नंतर दृढ निश्चय करून, दुर्बल बुद्धीचा पुरुषास कांहीं काम करण्यापूर्वीं जा क्षुल्लक अडचणी भिवविताात, त्याणी न भीतां तो आपला कार्यवाद तडीस नेण्याविषयीं निश्चित मनोनिग्रहाने झटतो, तोच पुरुष कोणत्याहि विषयांत कीर्त्ति मिळवील. यास दृष्टांत. कोणी एक विद्यार्थी मृत भाषा (ह्मणजे ज्या सांप्रत लोकव्यवहारांत बोलण्यांत येत नाहींत त्या) यांचा अभ्यास करूं लागला, इतक्यांत एक मित्र आला, त्याणे ह्मटलें कीं तूं आपला काळ व्यर्थ घालवित आहेस; जर अशा निरूपयोगी शब्दांपेक्षां, नवनव्या कल्पनांचा संग्रह करशील तर बरें. हें ऐकतांच हा आपला बेत फिरवून गणिताचा अभ्यास करूं लागतो. इतक्यांत दुसरा मित्र येऊन, मोठ्या गांभीर्याचा व सुज्ञतेचा हावभाव दाखवून पुसतो, कीं तूं काय कोठें विद्यालयांत गुरु "प्रोफेसर" होण्यास इच्छितोस? जर तसें नसेल, तर हा तुझा वेळ फुकट जात आहे; कारण संसारामध्यें साधारण गणित शिकलें ह्मणजे पुष्कळ झालें. हें कर्णीं पडतांच त्याणे आपलें भूमितीचें पुस्तक (यूक्लिड) फेंकून दिलें, आणि दु

सरा विषय हातीं घेतला; तोहि याचप्रमाणें शाहाण्याचा सूचनेवरून सोडिला. याप्रमाणें बेत बदलतां बदलतां सर्व आयुर्दाय खर्च झाला. अशा क्रमाचें मौर्ख्य सर्वांचा दृष्टीस पडल्यावांचून राहणार नाहीं. याचा निकृष्ट परिणाम हा होतो, कीं येणेकरून डळमळितपणाची सवय लागत्ये; आणि एवढ्या सवयीने चांगल्या रूपास येण्याचीं साधनें असूनहि निष्फल होऊन जातात. याजकरितां जो क्रम अवलंबन करायाचा तो विचार करून दृढ अवलंबन करा, आणि एकदा अवलंबन केल्यावर, भगीरथ प्रयत्न करून त्याप्रमाणें चाला.

जें आज करण्या जोगें असेल तें उद्यांपर्यंत शिलक ठेवण्याची सवय पाडिली असतां, आपले बेत कितीहि चांगले असले तथापि ते नाशाप्रत पावतील. तुह्माला असें वाटेल कीं, "त्या पत्राचें उत्तर उद्यां दिलें तरी चालेल; अथवा तें माझा मित्राचें काम उद्यां केलें तरी चालेल; कारण असें केलें असतां त्याचें नुकसान होत नाहीं." तर मी असें सांगतों कीं त्याचें नाहीं, परंतु तुमचें नुकसान होत आहे. कारण अशा एका पाशांत सांपडलां, कीं शत्रूने किल्ला बळकाविला असें समजा. तुह्माला असें वाटेल कीं "तो विचार अथवा ती अमुक अमूल्य गोष्ट आपल्या स्मरण वहींत उद्यीं लिहून ठेवूं." तें खरें; परंतु अशा लालनाने तुमचा मोठा तोटा होत आहे. प्रत्येक तास कांहीं तरी नियमाने सतत उद्योगाकडे लावून द्यावा. याप्रमाणें पूर्व संकेताने एक दिवस श्रम केले, तर संकेतरहित एक आठवड्यापेक्षां त्यांत विशेष श्रेय येतें.

मनोनिग्रहाचीं उदाहरणें देण्यास फार लांब जावयास न-

को. अर्वाचीन कालचा जितक्या सुधारणा व शोध त्यां तून बरेच मनोनिग्रहास आपला पिता ह्मणवितात. प्रथम **अमेरिके**चा शोध **कोलंबसाचा** मनोनिग्रहानें लागला; **युरोपियन्** लोकांस **हिंदुस्तानांत केप आफ् गुडहोप** कडून येण्यास, (ह्मणजे सांप्रतच्या सत्ताधीशांचा इकडे मूळ पाय शिरण्यास) पोर्टुगीस लोकांचा मनोनिग्रह कारण झाला साधारण रीतीनें पाहिलें असतां सर्व **इंग्रेज** लोकांचा कृत्यांत मनोनिग्रहाचा अंश बराच असतो. वीस वर्षांपूर्वी आगगाडीचें नावहि या देशांत थोड्यानींच ऐकिलें असेल; आणि तशांत **सह्याद्रि**पर्वत फोडून देशांतरीं जाणें हें तर कोणाचा स्वप्नींहि नसेल; परंतु एक कृत्य तर आज अनुभवसिद्ध आहे; दुसऱ्यास आरंभ झाला आहे; आणि पूर्वीं पर्वतछेद झाले आहेत, आणि सांप्रत क्रम चालला आहे, त्यावरून तेंहि कृत्य तडीस जाईल याविषयीं मला काडीमात्र संशय नाहीं. परंतु हीं सर्व कृत्यें, व अशींच दुसरीं जीं हालीं अनंत होत आहेत व जा झालेल्या कृत्यांचें वर्णन इतिहासांतरीं आहे, हीं मनोनिग्रहाचीं फळें होत.

आतां आपल्या लोकामध्यें बहुधा इतका उतावीळपणा शिरला आहे, कीं बहुधा सर्व लोक लहानमोठे सद्यःफलदायक धंदे हुडकूं लागतात. कांहीं उद्योग काढिला असतां प्रथम प्रश्न हा पुढें येतो, कीं यापासून तूर्त फायदा काय तो सांगा; मग पुढचें पुढें. शिजेतंव जांस धीर नाहीं, मग पिके तंववर कोठचा, अशी जेथपर्यंत आपल्या लोकांची स्थिति आहे; जंव हे दीर्घदृष्टि होऊन दूर लाभावर दृष्टि ठेवून सतत श्रमाची सवय पा

डणार नाहींत, तंववर यांचें स्थित्यंतर होऊन हे रूपास येतील हें दुरापस्त आहे.

इतक्याहि सवयी असून जर नेमलें काम, नेमल्या वेळेवर झालें नाहीं, तर सर्व निष्फल होईल; याजकरितां—

**४ कालनियमाची सवय पाडा.**

सर्व मनुष्यांचाने कालनियामक होऊं शकवेल, परंतु जसें नियामक असावें त्याप्रमाणें थोडेच राहातात. थोडकासा उशीर लावून सर्व काम करणें हें फार सोपें आहे; परंतु कालनियमाने जेव्हांचें तेव्हां काम करणें हें तसें सोपें नाहीं. परंतु अशी सवय आपल्यास आणि जगास अति उपयोगाची आहे. कालनियामक पुरुषाचें काम दुसऱ्याहून दुप्पट होऊन याला दुप्पट सुलभ पडून संतोष होतो.

कित्येकांस वाटतें कीं अशी सवय पाडणें हें हलकें काम आहे. मोठ्या बुद्धिमानाने अशी सवय पाडण्याची इच्छा ठेवणें हें अति हलकें आहे. तर काय **ब्लाक्स्टन्** याची बुद्धि हलक्या प्रतीची होती? याणे जी कालनियामकता स्वीकारिली, हें काय त्यामध्यें दुसरे मोठे गुण नव्हते ह्मणून कीं काय ? या दोहींतून कांहीं कारण नसतां जेव्हां तो आपलीं प्रख्यात व्याख्यानें देत असे, तेव्हां आपल्या श्रोते-मंडळीस तो एक क्षणहि वाट पाहायास लावित नसे. आणि जामध्यें हा गुण नसे, त्याविषयीं याचें मत कधीं चांगलें पडत नसे. **मिस्टर ब्रूअर** ह्मणून एका **ख्रिस्ती** धर्मोपदेशकाविषयीं असें लिहिलें आहे, कीं तो विद्यार्थी असतां मोठा कालनियामक असे. एके दिवशीं प्रातःकाळीं

सातांचा ठोका वाजतांच पाठाप्रमाणें सर्व विद्यार्थी प्रभूची प्रार्थना करायास उठले. गुरूने पाहिलें, तो **मिस्टर ब्रूअर** नाहीं, ह्मणोन कांहीं वेळ थांबला; इतक्यांत **ब्रूअर** आला असें पाहून त्यागे त्यास ह्मटलें "अहो सात वाजले, आणि आह्मी आरंभ करण्यास सिद्ध होतों, परंतु तुह्मी न आलां, हें पाहून आह्मास भ्रांति झाली कीं घड्याळ फार जलद चालत असेल; ह्मणून थांबलों." नंतर पाहातां खरें खुरेंच घड्याळ कांहीं मिनिटें जलद चालत होतें.

जरी कर्ज फेडण्याविषयीं नियामक असणें यांत मोठा सद्गुण नाहीं; तरी हेंहि क्रियेकांत नसतें. मुख्यत्वेंकरून नित्य कृतीमध्यें आपल्या हातून कालनियामकपणा फार राहात नाहीं. कोणी असें ह्मणतो कीं मला आतां वेळ लागला, परंतु असो असें पुनः होणार नाहीं. तसेंच एकादा ह्मणतो आजचा माझा संकेत तडीस गेला नाहीं. याप्रमाणें ढकलाढकली करणारांचें बोलणें असतें. परंतु माझें असें सांगणें आहे, कीं सर्व गोष्टींमध्यें तुह्मी कालनियामक असा. जर अमुक तासास उठायाचें असें तुमच्या मनांत असेल, तर तत्क्षणीं उठून तयार व्हा. जर भोजनापूर्वी इतकें काम करायाचें असेल, तर तें करण्यांत किमपि कसर करूं नका. जर कोठे सभेस अथवा मित्रांस भेटायास जावयाचें असेल तर नेमल्या वेळीं तेथे जा. जर सभेमध्यें आपणास कांहीं करायाचें असेल तर मग आपण जरासे उशीर करण्यास कदाचित् प्रवृत्त होऊं. एका गृहस्थाची या उशीर लावण्याचा सवयीशिवाय दुसरी कसली ख्याति नव्हती. तो ह्मणत असे, कीं आपली लोकानीं वाट पाहावी यांत मोठेपणा आहे. आतां इतकें

खचीत आहे, कीं कोणी सभा तुमची वाट पाहात बसली असून, तुह्मी आलां असतां आनंदित होईल, परंतु जर तुह्मी पूर्वींच येऊन आपले स्थानीं असतां, तर मला वाटतें कीं त्यांस विशेष आनंद झाला असता. जर कोणत्याहि दोन गोष्टी करायाच्या असतील; ज्यांतून एक केलीच पाहिजे, आणि दुसरी करण्याविषयीं तुमची फार इच्छा आहे, तर जरूरीची असेल ती प्रथम करा. हा नियम नठेविल्याने आपण आपल्या कामांत कालनियामक होऊं शकत नाहीं, असें बहुधा होऊन जातें.

आपल्या लोकांचा कालनियमाविषयीं वर्णनच करायास नको. कारणत्यांजवळ काळाची गणतीच नाहीं. मग याणीं हिशेब ठेवून नियामकता ती कशाकरितां ठेवावी? कोणाला भेटायास गेलें, ह्मणजे प्रथम गांठपडण्यासच चार घटिका जातात, (भीत भीत चार घटिका ह्मणतों हो!) कांहीं प्रसंगीं दिवसांचे दिवस, व महिन्याचे महिनेहि जातात. नंतर मग पुढें डोहळ्यांवरून गर्भलक्षणें. त्याप्रमाणें, त्याचा कार्यभाग जो कांहीं होणें असेल तो, याच प्रमाणें कालनियमानें होतो. कोणाएकाचे घरीं चार वाजतां जाण्याचें निमंत्रण असलें, आणि आमची मंडळी सात वाजतां जमली तर मग त्या गृहस्वामीनें आपला भाग्योदयच समजावा. ही वाईट चाल इतकी आमच्या लोकांच्या देहांत निबिड दाटली आहे, कीं यांचे मोठें दुर्दैवाचेंच ही सूचक चिन्ह आहे असें समजलें पाहिजे. अहो! जे केवळ पोटार्थी, ज्यांचा केवळ परान्नावर निर्वाह, तेहि कोणी अत्यादरें आमंत्रण केलें असतां कालातिक्रम केल्यावांचून राहात नाहींत; मग इतरांकडे पाहा-

व्यसनच नको. फार काय सांगावें? परंतु या ज्ञानप्रसारक सभेंतील सभासदांसहि कांहीं वर्षांमागें बरेच वेळ वरील दोषाविषयीं निषेध करण्याचे प्रसंग आले होते.

वरील सवय लागून सर्व कृत्यें सुरळीत चालण्यास आणखी एक सवय पाहिजे ती कोणती तर;—

**५ प्रातःकाळीं लवकर उठणें.**

दीर्घायुषी आणि विख्यात असे पुरुष बहुधा प्रातःकाळीं उठणारे होते. उशिरां उठलें ह्मणजे, आपलें काम आरंभण्यास उशीर होतो. आणि मग त्या दिवशीं सर्व कामाचा विघाड होतो. **फ्रांक्लिन्** * ह्मणत असे कीं जो उशिरां उठेल, त्याणें जरी सारा दिवसभर धांवाधांव केली तरी रात्रपर्यंतहि कदाचित् त्याचें काम संपणार नाहीं. **डीनस्विफट्** ह्मणून इंग्लिश ग्रंथकार ह्मणतो कीं सकाळचा प्रहरीं निजून राहाणारा असा एकहि मनुष्य कीर्तीस चढलेला पाहिला नाहीं.

**बफन्** नामक सृष्टिशास्त्रवेत्ता आपले ग्रंथांविषयीं असा इतिहास वर्णन करितो, कीं "लहानपणीं मला निद्रेची फार गोडी असे. ती माझा बहुत काल हरण करी. परंतु तिचा पराभव करण्यास माझा बिचारा चाकर **जोसेफ** मला फार उपयोगी पडे. जा दिवशीं मला साहा वाजतां उठविशील त्या दिवशीं तुला एक क्रौन (ह्मणजे अडीच रुपये) देईन असें **जोसेफास** सांगें. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं मला त्रास देऊन जागें करण्यास तो चुकत नसे, परंतु त्याचा बदला, त्याला शिव्या मिळत. दुसऱ्याहि दिवशीं तो तसें करी. तथा-

---

* एक **अमेरिकन्** तत्ववेत्ता.

पि मी उठत नसें आणि तेणेंकरून माझा काल व्यर्थ गेला असें दोन प्रहरीं मला कबूल करावें लागे. मी त्याला त्या दिवशीं सांगें, कीं तुला कसें काम साधावें तें समजत नाहीं. तूं माझा वचनाचें स्मरण ठेवून माझें रागानें भाषण लक्षांत आणूं नको. असें झालें ह्मणजे दुसऱ्या दिवशीं त्यानें बलात्कार करावा, तेव्हां मी त्याजवळ क्षमा मागावी, त्याला निघून जा ह्मणून आज्ञा करावी, शेवटीं कहर करावा; परंतु **जोसेफानें** आपलेंसें करावें; तेव्हां मला उठणें प्राप्त व्हावें. याप्रमाणें प्रत्यहीं जेव्हां तो मला उठवी तेव्हां जा त्याला शिव्या मिळत, त्याचा बदला मी उठलों ह्मणजे त्याचे आभार मानीं आणि एका अवरानंतर त्याला एक क्रौन इनाम देईं. होय खचित सांगतों कीं माझा ग्रंथांपैकीं दाहाबारा पुस्तकें विचाऱ्या **जोसेफाचा** योगानें झालीं आहेत."

**प्रशियाचा** राजा **फ्रेडरिक् धिग्रेट** हा वयातित व रोगग्रस्त झाला असतांहि त्याचा असा सक्त हुकूम असे कीं आपल्याला प्रातः चोहोंचा पुढें निजूं देऊं नये. रशियाचा बादशाहा **पीटर धिग्रेट** हा **लंडन** एथें सुतार काम आणि लोहार काम शिकत असतां, तसेंच रशिया देशामध्यें राज कारभार चालवीत असतां सार्वकाळ अरुणोदयापूर्वीं उठत असे. •तो असें ह्मणे कीं "मला माझें आयुष्य जितकें वाढवेळ तितकें वाढवायाचें आहे, ह्मणून मी जितका थोडें निजून निर्वाह होईल तितका निजतों." याचविषयीं **डाड्रिज** ह्मणून एका ग्रंथकारानें असें ह्मटलें आहे, कीं जर कोणी पुरुष प्रत्यहीं एकाच तासास निजून सात वाजतां उठायाचा तो पांच वाजतां उठेल, आणि याप्रमाणें सतत चाळीस

वर्षें क्रम चालवील, तर दहा वर्षें वाढल्या इतकें बहुधा त्यास श्रेय येईल.

लवकर उठतां यावें याकरितां लवकर निजणें अवश्य आहे. याशिवायहि लवकर निजण्याविषयीं कारणें पुष्कळ आहेत. लवकर निजलें असतां आपली दृष्टि बहुधा मंद न होतां शरीरास आरोग्य होईल. सृष्ट्याचा क्रम पाहिला असतां असा दिसतो, कीं पूर्वरात्रीस विराम घ्यावा. याविषयीं डाक्टर ब्राइट आपल्या शिष्य वर्गास असें सांगत असे कीं मध्यरात्रीपूर्वीं एक तास निजलें असतां, पश्चात् दोन तास निजण्याचें श्रेय येतें. याकरितां रात्रौ दहांबरोबर दिवा मालविण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें चालावें, दहा वाजतां निजून पांच वाजतां उठलें तरी चालेल; कारण बहुधा सात तासांची विश्रांति या शरीरास पुष्कळ आहे.

इतकें लवकर उठण्याची सवय कशी पडेल असें ह्मणाल, तर असा विचार करा, कीं तुह्मी आज रात्रौ दाहा वाजतां निजलां. आतां कदाचित् तुह्माला फार वेळ जागण्याची सवय असल्यास दोन घटिका झोंप आली नाहीं, आणि प्रातः पांचांची घंटा वाजली, तेव्हां तुह्मी तर साखर झोंपेचा गुंगींत आहां. आतां कसें करावें ह्मणून विचाराल तर सांगतों ऐका. जर या जगामध्यें कांहीं नाव करण्याची तुमची उमेद असली, तर आधीं ही सवय तुह्मी पाडिली पाहिजे. जर द्रव्य खर्चून ही सवय संपादेल, तर कितीहि खर्चण्यास मागें सरूं नका. आपणास लवकर उठण्याची सवय पाडण्याकरितां कोणी वाजा करणारें घड्याळ बाळगितात. आणि त्यावरच त्यांचा बेत बसतो. सारांश,

हरतऱ्हेने लवकर उठण्याची सवय पाडिली पाहिजे. एक-दा जागे झालां, ह्मणजे एकदम उठून हांतुरगाखालीं उभे राहा. जर क्षणभर कांकूं करीत बसलां तर, लागलीच झोंप तुह्माला पकडील; नंतर मग तुमचा निश्चय फुकट होऊन, तुमचा आशा व्यर्थ जातील. आणि सवयी मोडतील. जा तरुण पुरुषांस लवकर निजण्याची सवय आहे, त्यांला लवकर उठण्याची सवय लागलच लागेल; आणि मग रात्रीपासून जे चित्तास अनेक पाश प्राप्त होतात त्यांपासून ते मुक्त होतील. जास लवकर उठण्याची सवय आहे, तो बहुधा उशिरां उठणाऱ्यांपेक्षां फार वर्षें वांचेल; त्यापासून विशेष उपयोग होऊन त्याची कितीहि अधिक वाढेल; त्याचें आयुष्य स्वस्थतेने आणि आनंदाने लोटेल. याविषयाचें इतका वेळ प्रतिपादन करण्याचें कारण विद्यार्थ्यांस बहुधा प्रातः निजून राहाण्याची फार सवय लागत्ये, आणि ती मग सुटत नाहीं.

प्रातः उठण्या विषयीं आपल्या शास्त्रांत हि बहुतच सांगीतलें आहे. त्या अर्थी आतां एथें फार विवेचन करीत नाहीं. प्रातः उठण्याचा सवयीपासून बहुधा रात्रौ लवकर निजण्याची सवय लागत्ये, तीहि मोठ्या फायद्याची आहे.

आतां आपणास वरील सवयींनी जें ज्ञान संपादायाचें तें सर्वत्र प्रसृत आहे ह्मणून;–

**६ जो पुरुष भेटेल त्यापासून कांहीं तरी उपदेश घ्या.**

तुह्मीं चाळिशींत या तंववर, जर नियमानुसार वर्तन असेल तर त्याप्रमाणें, आणि नसेल तर त्याप्रमाणें, तुमचे योग्यतेमध्यें तारतम्य होईल. सर्व थोडे थोडे बहुधा या नि-

यमा प्रमाणें वर्ततात; परंतु अशीच सवय जानां असे फार थोडे; फारकरून कांहीं स्वार्थासाठीं अथवा खुशीसाठीं असें करितात. परंतु सर्व वस्तूंपासून आपलें व्यावहारिक ज्ञान वाढविण्याविषयीं आपण फार मोठेपणीं आरंभ करितों. *सर वाल्टर स्काट् असें सांगतो कीं. कोणीहि कां मला भेटेना; त्याचा धंदा कांहीं असो, अगदीं एकादा मूर्खशिरोमणि घोडेवाला कां असेना ! तरी त्यापासून कांहीं तरी मला पूर्वीं माहित नव्हतें असें, वउपयोगी असें मी शिकें. त्याला सर्व गोष्टींची माहिती असे त्याचें कारण हें असें दिसेत. या जगामध्यें सदोदित जसे डोळे उघडे ठेविले पाहिजेत तसे कान हि उघडे ठेविले पाहिजेत. '

सीसिल ह्मणून एक इंग्लिश प्रधान होता; तो असें ह्मणतो, कीं माझे आईजवळ एकदासी असे. ती फार शाहाणी असे. एका मनुष्यास जवांची दारू करण्याकरितां बलाविलें होतें, आणि त्याचें काम पाहून ती कृति शिकायास तिला सांगितलें होतें. त्याप्रमाणें तो मनुष्य कांहीं वेळ तें काम करीत असतां मधील कांहीं कृति केली ती दासीस समजली नाहीं; त्यावरून हिणे त्यास विचारितांच त्याणे हिला मूर्ख असें ह्मणून पुष्कळ दुरुत्तरें बोलिला. नंतर जेव्हां माझा आईने त्या दासीस विचारिलें, कीं हें वाईट बोलणें त्वां कसें सहन केलें ! तेव्हां ती ह्मणाली, कीं त्यापासून मला जें ज्ञान प्राप्त झालें त्या करितां, मी त्याहूनाहि हजारपट आणखीं सोशिलें असतें. आपल्या धंद्या खेरीज दुसरें कांहीं आपणास माहीत असूंनये हा समज खोटा आहे. अशी ह्मण आहे कीं जा रस्त्याने जावयाचें नाहीं त्याची चौ-

*एक स्काटलंडांतील कवी.

कशी कशास पाहिजे? तर असें नाहीं, जो तो मनुष्य आपल्या धंद्याविषयीं चांगला माहितगार असतो; आणि त्यांतील कितीएक समजून घेण्यास योग्य अशा गोष्टी त्यास माहित असून आपणास नसतात. याजकरितां जो कोणी भेटेल त्यापासून किंचित् तरी उपयुक्त ज्ञान संपादावें; तेणेकरून आपल्या धंद्यांत आपली कीर्ति कमी होणार नाहीं.

यावरून सर्व गोष्टी शिकाव्या असें मी तुह्मास सांगतों असें नाहीं. तर इतकेंच सांगतों कीं मुख्य एक उद्देश ठेवून, त्याशीं ज्या वस्तूंचा संबंध असेल त्यांकडेहि किंचित् लक्ष द्यावें. जसें आपल्यास दूर देशीं कांहीं काम करायास पाठविलें तर त्या स्थानीं पोचूं पर्यंत वाटेंत नेत्रादिकांचा उपयोग करूं नये काय? तर करावा. आपला जो मूल उद्देश तो उत्तमरीतीनें शीघ्र तडीस न्यावा खरा; परंतु वाटेनें जे चमत्कार दृष्टीस पडतील ते कां पाहूं नये? जा चमत्कारिक गोष्टी कानीं येतील त्या कां ऐकूं नये? तेणेकरून काय आपल्या कामास अडथळा येतो? असें नाहीं; तर उलटें आपलें शाहाणपण, व चतुरपणा, हीं वाढतात; तेणेकरून आपण अधिक उपयोगी होतों.

सर्व जें कांहीं ज्ञान संपादन करायाचें त्यास स्थैर्य पाहिजे. परंतु जर आपलीं मतें क्षणक्षणा बदलूं लागलीं, आणि आतांचे विचार घटिकेंत नाहींसे झाले, तर मग आपले ज्ञानाचा उपयोग काय? यासाठीं;——

**७ आपल्या वृत्तींविषयीं व कृतींविषयीं दृढ विचार असूं द्या.**

जो चांगला विद्यार्थी आहे, तो जें कांहीं अवलोकन क-

रायाच असेल, तें प्रथमच पुर्तेपणीं अवलोकून, नंतर त्याचें मनन करून तें दृढ करितो. यामुळें पुनः केव्हांहि तो विषय त्यापुढें आला, तरी त्याचा विचार झालेलाच असतो. याजकरितां जो विषय पाहायाचा असेल तो वरवर पाहूं नका. जर आतां पुर्तेपणीं पाहायास अवकाश नसेल, तर अवकाश मिळेपर्यंत थांबा. तो विषय मोठा असो कीं लहान असो, जर तो पाहाण्याजोगा असेल, तर एकदा पाहून टाका. असा कीं जरी पुनः केव्हांहि तो विषय तुह्मापुढें आला, तरी तुमचें मन त्याविषयीं निश्चित व निश्चल असावें. याप्रमाणें निश्चित व निःशंक ज्याचे विचार झाले असतात, तो पुरुष स्थिरबुद्धि असतो. सर्व कांहीं गोष्टी जांतून विचारशक्तीनें तारतम्य काढायाचें असतें तद्विषयक हे विचार असतात. कोणत्याहि गोष्टीविषयीं सिद्धांत करण्याची घाई करूं नये. कांहीं लोकाना विचारशक्ति असून उतावळीमुळें चुका करितात. याजकरितां जर स्वस्थपणानें कोणत्याहि विषयाचा विचार करितील, तर त्यांचे सिद्धांत बहुधा बरोबर होतील.

**लाटिमर** या इंग्लिश धर्माध्यक्षास जेव्हां **मेरी** राणीचा कारकीर्दीत धर्माविषयीं वाद करून आपलें मत स्थापन करायास सांगूं लागले, तेव्हां त्याणे वाद केला नाहीं. कारण तो वृद्ध झाला होता यामुळें त्याची बुद्धि किंचित् कमी झाली होती. परंतु त्याणे पूर्वीं आपल्या धर्माविषयीं अशी खातरी करून घेतली होती, कीं त्याणे आपलें मत नसोडितां प्राण दिला. अशा स्थिर बुद्धीचा पायावर ज्याचे वर्त्तणुकीची इमारत बांधली असेल, तिला कोणत्याहि उत्पाताची भीति नाहीं.

कितीएक लोक आपल्या पोषागाचीच थोरवी मिरवीतात. कित्येक अतिमलिनत्व स्वीकारून आपला साधेपणा दाखवितात. हीं दोन्ही कर्में निंद्य आहेत; याविषयीं इतकेंच माझें सांगणें आहे, कीं—

**आपलें शरीर व पोषाग साधा, स्वच्छ, व नीट असूं द्या.**

शरीर हें आत्म्याचें घर आहे, याजकरितां त्याचा मोठा गर्व वाहूं नका. जसा कोणी चांगला मनुष्य आपले घराची आंतून बाहेरून स्वच्छता ठेवितो, तसा तुमचा पोषाग साधा आणि स्वच्छ असूं द्या. आपले कपडे इतके उंच असावे, कीं ते स्वच्छ बाळगण्याविषयीं आपले मनांत आस्था राही. आणि ते तगविण्यामध्यें आपली दक्षता दृष्टीस पडे. व्यायामाचे वेळीं आणि अभ्यासाचे वेळीं निरनिराळे कपडे असावे. आपला पोषाग ऊबदार असावा, आणि मळला असतां वरचेवर बदलावा. आपले पाय सुखे आणि गरम ठेवावे. असें करण्याकरितां दररोज चालण्याचा अभ्यास ठेवावा.

पोषागाविषयीं छांदारी मिरवूं नये. आपला आंगरखा, पागोटें, धोतरें स्वच्छ ठेवावीं; परंतु जसें काय जन्मास येऊन हेंच सार्थक करायाचें आहे असें दाखवूं नये, अथवा मनामध्येंहि वागवूं नये.

आपले दांत स्वच्छ ठेवण्याविषयीं फार दक्ष असावें. दिवसांतून नियमित वेळेस मीठ व चांगल्या कोळशाचा राखुंडीनें घांसावे, आणि निजायाचे वेळीं मुख्यत्वेंकरून घांसल्याशिवाय तर निजूंच नये. याप्रमाणें केलें असतां, बहुधा म्हातारपणपर्यंत दांत चांगले राहातील. या गोष्टीवर

मी इतकें प्राबल्य ठेवितो याचें कारण, असें न केलें असतां असे परिणाम होतात, कीं दांत कमी झाल्यामुळें श्वासोच्छ्वास दुर्गंधियुक्त येतो; दांत दुखूं लागून वेदना होतात अन्नाचें चवर्ण न झाल्यामुळें आरोग्यता नाहींशी होये; आणि दांतहि लवकर पडतात. सांप्रत जरी ही गोष्ट हलकी अशी वाटत असली, तरी पुढें जड जाईल, आणि मग उपाय चालणार नाहीं.

छांदिष्टपणापासून दूर राहावें. कारण छांदिष्ट मनुष्याचा तब्यतीप्रमाणें वर्तण्यास लोकांस फार भारी होतें.

जेवणाचा वेळीं मर्यादेने चालावें. आपली कितीहि हुशारी व विद्वत्ता असली, तथापि आपली चालचर्या, रीतभात, जर उद्धट असली, तर आपला चाहा पडणार नाहीं. आपल्या स्वाध्यायांबराबर गृहस्थाईने वागावें. हलकटपणाने अथवा अनाडीपणाने वर्त्तूं नये. कारण जसा आतां तुमचा स्वभाव ठेवाल, तसा तो जन्मवर राहील. सारांश पोषाग व शरीर हीं बेतवार ठेवावीं.

आपलीं पुष्कळ कामें धांदलीने बिघडून जातात, आणि अर्धवट राहातात; याजकरितां;—

**९. जें काय कराल तें चांगलें करीत जा.**

साधारण रीतीने आपण इतके उताविळ असतों, कीं बहुधा जितकें चांगलें काम आपल्या हातून व्हावें तितकें क्वचितच एकाद्याचा हातून होतें. बहुधा कोणासहि विचारणें झाल्यास, त्या गृहस्थाने अमुक गोष्ट किती वेळांत केली हो? असें विचारितात; किती चांगली केली, असें बहुधा कोणी विचारित नाहीं. ही मोठी वाईट सवय आहे. जी गोष्ट करण्याजोगी असेल, ती चांगलीच केली पाहिजे.

कोणास वाटेल कीं असें केल्याने काम लवकर आटोपत नाहीं. तर असें नाहीं प्रथमपासून चांगलें करण्याची सवय ठेविली पाहिजे; नंतर सहवास अधिक पडत गेला ह्मणजे हस्तकौशल्य वाढून काम लवकर होईल. ही सवय प्रथमपासून पाडून न घेतल्यामुळें, किती लोकांस चांगलें लिहितां वाचतां येत नाहीं? **युरिपिडीस** (ह्म० एक **युनानी** कवि) हा प्रति दिवशीं तीन ओळी कवन करीत असे. त्याच वेळीं दुसरा एक कवि असे तो तीनशें ओळी रची. परंतु एकाची कविता चिरकाळ राहिली, आणि दुसऱ्याची अल्पायुषी झाली. याजकरितां वाचणें, तें थोडेंच वाचावें. भाषण मित असावें. आणि ग्रंथरचना करणें, ती थोडकीच परंतु सरस असावी. कारण उतावळे पुरुषापासून आपलीं कर्तव्यें थोडींच सिद्धीस जातात.

एका विद्वानाच्या उद्योग व त्याचीं फळें पाहून आश्चर्य चकित होत्साता कोणी गृहस्थ त्यास पुसतो, महाराज! हा इतका उद्योग आपण करितां तरी कसा! तेव्हां त्याणे उत्तर दिलें, कीं त्यांत काय झालें! मी कोणे वेळीं एकच गोष्ट करीत असतों, आणि जी एकदा हातांत घेतों ती लागलीच तडीस नेतों. ही गोष्ट चांगली लक्षांत ठेविली पाहिजे.

कांहीं लोकांची चाल अशी आहे, कीं प्रथम वाईटसाईट पत्र लिहून, शेवटीं घाईने लिहिलें याजकरितां चुक्यांची व वाईट अक्षराची क्षमा करावी असें लिहितात. तर असें करणें हें अगदीं अयोग्य आहे. अशी घाई करण्याचें बहुधा कांहीं प्रयोजन नसतें. आणि तसें केल्याने आपलेंच नुकसान हर कोणे समयीं होऊं पाहातें. कांहीं लोक स्मरणार्थ टिपणें अथवा यादी करून ठेवितात;

तींच टिपणें त्यांचीं त्यांसच कांहीं दिवसांनी वाचत नाहीं शीं होतात. अशा पुरुषांस,–

"स्वयमपि लिखितं स्वयंन वाचयति."

हें वचन कोणे वेळीं व्यवहारांत लागू करीत असतात. कित्येक लोक काम करणें तें इतकें जलद करितात, कीं काय केलें त्याची त्यांसच स्मृति नसत्ये; उगाच वरवर आठवण मात्र त्यांस राहत्ये. याच रीतीने पुष्कळ पोकळ पांडित्य करणारे पुरुष होऊन जातात, त्यांचा हातून कांहीं सांगायासारिखें तडीस जात नाहीं.

कामक्रोधादि वासनांहीं ज्याला आपला दास केला, तो दुर्बल झाला. मग अशाचा हातून काय व्हायाचें आहे! यास्तव,–

## १० आपल्या मनोवृत्ति स्वाधीन ठेवण्याविषयीं यत्न करा.

जर सर्व वस्तूंचें वर्चस्व संपादन करणें आहे, तर प्रथम आपल्या मनोवृत्ति आपल्या आहारीं ठेविल्या पाहिजेत. हे कृत्य सोपें नाहीं; मोठें कठिण आहे. कोणे कोणे समयीं असें दृष्टीस पडतें, कीं एक गृहस्थ मोठा विद्वान् असतो; परंतु त्याचा क्रोध इतका अनावर असतो, कीं तो क्रोधाविष्ट झाला ह्मणजे तितका वेळपर्यंत तो वेडाच होऊन जातो. कोणी गृहस्थामध्यें सर्व गुण असून, विशेष लोभामुळें सर्व बिघडून जातें. कोणी बाहेर पडला अथवा कांहीं ग्रंथ लिहूं लागला ह्मणजे गोड स्वभाव दाखवितो व रमणीय वर्णनें करितो, परंतु घरीं पाहूं लागलें असतां कुटुंबांतील मनुष्यांस त्रास देतो. असें होण्यास कारण कामक्रोधादिकां-

चा तो दास असतो. याजकरितां जो पुरुष या कामक्रोधादिकांस आपले दास करील, तोच शूर ह्मणावा.

जवळचा मनुष्यांस उतावळीने टाकून बोलण्याची सवय फार वाईट आहे. हिचें लालन केल्याने ही फार वाढत्ये; आणि मग पुढें सुटत नाहीं. याजकरितां प्रौढपणा स्वीकारिला पाहिजे. जें काय बोलायाचें तें घडघडीत मोकळ्या मनाने बोलवें. तें केवळ दर्शनीं नव्हे, तर अंतःकरणापासून असावें. कांहीं लोक मोकळ्या मनाचे असतात, त्यांचा थोरपणा लागलाच दिसून येतो; आणि मग त्यांचा चाहाहि तसाच पडतो. जन्मतः सर्व मनुष्य सारखे असतात असें नाहीं. कांहीं मोकळ्या मनाचे असतात; कांहीं मनुष्यांचा त्रास करणारे, खुनशी, कुजकट स्वभावाचे असतात. परंतु अशी जरी मूळची वाईट प्रकृति असली, तरी त्याचप्रमाणें चालावें हें नीट नाहीं. जरी कदाचित् लहानपणीं आपला वाईट स्वभाव बदलण्याविषयीं कोणी यत्न केला नसेल, तर आपणहि समजूं लागल्यावर यत्न करूं नये हें सुयुक्तिक नव्हे.

आपल्या स्थितीमध्यें संतुष्ट असावें. बहुधा आपलीं मानसिक दुःखें अतृप्तीपासून उत्पन्न होतात. तर असा विचार केला पाहिजे, कीं सर्वज्ञत्व अथवा सार्वभौमत्व हें एक ईश्वरासंच आहे. जर एका मोठ्या महाद्वीपांत फिरून त्याचा शोध करायास गेलें, तर त्यांत कोठे थंडीची कटकी, कोठे उन्हाचा झळा, कोठे धुळीची अंधी, कोठे पर्जन्याचा टोंभ लागेलच लागेल. सर्वच एकसारिखे रमणीय बाग लागतील अशी कोणी अपेक्षा करूं नये. तसें शाळेंत जाऊन ह्मणजे सर्व शास्त्रांमध्यें प्रवीण होईन अशी

कोणी अपेक्षा राखूं नये; आणि अशी व्यर्थ अपेक्षा मनांत आली, तर तिची पूर्तता न झाली ह्मणून खंती तरी होऊं नये. तसेंच संसारामध्यें नवविध संपत्ति आपणास नाहींत ह्मणून खेद मानूं नये.

आपल्या स्थितीविषयीं बहुधा उगाच विचार करीत बसणें, आणि वृथा मनोरथ बांधणें, हें आपल्या मनास अस्वस्थता व खेद उत्पन्न करून घेण्याचें कारण आहे. असे मनोरथ बांधण्याची सवय मोठा नाश करिते. हिचा योगानें आपल्यास दुसऱ्याचें बरें पाहावत नाहींसें होतें. अर्थात् हेवा उत्पन्न होतो. तसें झालें, ह्मणजे आपलें जें नेहेमींचें जाडी भरडी भाकर मिळविण्याचें काम असतें, तें आपल्यास गोड लागत नाहीं. व्याप्तीवांचून प्राप्ति नाहीं. यावर लक्ष न देतां श्रमविरहित एकदाच आपण श्रीमान् व्हावें, आपणास मोठा राजाश्रय मिळावा, अथवा आपण मोठे राजेच व्हावें, अशा कल्पना येऊं लागतात. नंतर क्षणभंगुर कल्पनेचा कैफ उतरून गेला, ह्मणजे पाहातों तंव आपण जुने गरीब मूर्ख होतों तसेच आहों. असें अनुभवास आल्यावर मग दुप्पट खेद होतो. आणि नेहेमीचा धंद्याची गोडी कमी होऊन, तो नीट न चालल्यामुळें आपल्या उपजीविकेसहि बाधा होऊं लागते. मग तुपाचा घडा वाहणाऱ्या मोलकऱ्यासारिखी आपली अवस्था होते. अशा कल्पनांचा हातीं आपली लगाम एकदा लागली, ह्मणजे मग विश्रांतीचा नावास हरताळ लाविला पाहिजे.

आतां कितीहि ज्ञान संपादिलें, तथापि त्यांतून सत्यमिथ्याची जर निवड करितां न आली, तर त्यापासून

तादृश उपयोग व्हावयाचा नाहीं. याकरितां आपली,

**११ तारतम्य विचार शक्ति दृढ केली पाहिजे.**

कांहींची अशी शक्ति असते, कीं ते कोणी भेटल्या बराबर सहज (जसे कांहीं अंतर्ज्ञानानेच) त्याची परीक्षा करितात. तसेंच एकादा ग्रंथ हातांत घेऊन, एकदोन पृष्ठें इकडे तिकडे उलटून निःशंकपणें त्याची योग्यता सांगतात. जर कोणा पुरुषाविषयीं, अथवा ग्रंथकाराविषयीं आपले मनांत विरोध आला, तर तो काढून टाकणें दुर्घट होतें. त्या विरोधानें विचार शक्ति लपेटली जाऊन आपण पक्षपाती होतों. जर अशी सवय लावून घेतली, तर मग तारतम्यविचारशक्तीचें न चालतां, विरोधाकडे ओघ जातो. केवळ न्यायी आणि शुद्ध अशी बुद्धि असणें, हें एक विरल व अमोलिक ईश्वरी दत्त आहे. परंतु अशी बुद्धि असून ती सर्व कृत्यांमध्यें समतोल चालणें, हें फारच विरळा. असें स्थिरबुद्धित्व ईश्वरें थोड्यांसच दिलें आहे. त्यांतूनहि कांहीं पूर्वीचा ओढी मागें जांचा बुद्धीचा कल जात नाहीं असे विरळा. याविषयीं उत्कृष्ट पाहिलेला दृष्टांत डाकटर टाडु लिहितो, तो असा. तो ह्मणतो, कीं एका घड्याळवाल्यानें मला सांगितलें, कीं "एका गृहस्थानें एक उत्कृष्ट घड्याळ मजजवळ आणून दिलें होतें, तें बराबर चालत नसे. घड्याळ तर फार सुंदर होतें. तें मी मोडून नीट चालावें ह्मणून पुनः पुनः बसवीं, असें २० वेळा केलें. त्यांत व्यंग दिसेना, आणि घड्याळ तर बराबर चालेना. शेवटीं माझा मनांत आलें कीं कदाचित् तुलाचक्राचें लोहचुंबकाशीं सान्निध्य झालें असेल.

तेव्हां मजजवळ लोखंडाची काडी होती ती त्या चक्राजवळ नेऊन पाहातों तंव माझी कल्पना खरी झाली. यापासून सर्व बिघाड झाला. घड्याळांतील बाकी सर्व तिख्याचीं यंत्रें त्या चक्राला विकार करीत. मग नवें चक्र घालितांच घड्याळ सुयंत्र चालूं लागलें." याजकरितां बुद्धि कितीहि स्थिर असो, तिला असा पूर्वीचा अज्ञानाचा लोहचुंबकाचा ओढा असला, तर ती बरोबर चालणार नाहीं.

आपले वास्तविक महत्वापेक्षां अधिक मानण्याकडे मनुष्याचे बुद्धीचा कल असतो. ही गोष्ट जा वेळीं स्वतांचा वर्त्तणुकेचा विचार कराल तेव्हां लक्षांत ठेवा. आपले मित्र आपली स्तुति करितील, आणि त्याहूनहि आपलीं अंतःकरणें विशेष करितील. या दोहींचा दृष्टीस आपले दोष पडणार नाहींत; अथवा पडून तीं पाहाणार नाहींत, अथवा त्यांचें तीक्ष्णत्व कमी करितील. त्यापेक्षां आपल्या शत्रूंचा जो अभिप्राय तो बहुधा याहून बरावर असेल असें समजा. याविषयीं एक कवि असें ह्मणतो.

"उग्रोप्यसत्कृनार्यः कीर्त्तिविहीनोपि पंकयुक्तोयः॥
"मंदोप्यशनिकठोरः दुर्जनसंघस्तनोतु मयि करुणां."॥

अर्थ. उग्र, ज्ञात्यांचा तिरस्कार करणारा, कीर्त्तिविहीन, पापयुक्त, मंद, आणि वज्रवत् कठोर, असा जो दुर्जनसमुदाय तो माझावर कृपा करो.

कारण आपलीं व्यंगें जीं आपल्या दृष्टीस पडत नाहींत, तीं आपले शत्रु दृष्टीस पाडितील. दुसरें, जा कृत्यासाठीं जग आपली स्तुति करितें, त्याचा हेतु जर पापरूपी असेल, तर जगाचा अभिप्रायानें आपण आपलें माप करूं नये, हें लक्षांत ठेविलें पाहिजे; कारण कांहीं आप-

ल सद्गुण शुद्ध नसतात, आणि कदाचित् आपण ते सर्वच्च उत्तम असें समजत असूं.

**डाकटर टाड्ड** असें वर्णन करितो, कीं एका मोठ्या लष्करी सरदारानें आपणास सांगितलें, कीं मादक रस ह्मणजे दारू अगदीं वर्ज करणें हें योग्य आहे कीं काय? आणि आपण सांप्रतचा अवस्थेमध्यें वर्ज करणें अवश्य आहे काय? याचा विचार करावा असें मनांत आणून त्या सरदारानें एक मोठें पान घेतलें, आणि त्यावर दारू प्यावी या मताची सिद्धता करण्याकरितां जितक्या वादयुक्ति सुचल्या तितक्या लिहिल्या, आणि पाहतो तंव त्या इतक्या भारी दिसूं लागल्या, कीं दारू ग्रहणकरण्यास प्रत्यवाय नाहीं असें त्यास वाटूं लागलें. परंतु या मताची पक्की सिद्धता करण्याकरितां दुसरें पान घेऊन त्यावर तो मद्यसेवननिषेधाविषयीं प्रमाणें लिहूं लागला. आणि पाहतो तंव हीं निषेधपर प्रमाणें सेवनपर प्रमाणांहून जाजती वाढत चाललीं. नंतर दोहोंची तुलना करितां दुसरें असें समजलें, कीं सेवनाविषयीं जीं प्रथम प्रमाणें लिहिलीं होतीं, त्यांतील बरींच निषेधपर असून त्यांत घातलीं गेलीं होतीं; तीं दुसऱ्या पानावर घालतांच सेवनाविषयीं थोडींच प्रमाणें राहिलीं. तेव्हां त्याणे तारतम्य पाहून राहिलीं मद्यसेवनाविषयींचीं प्रमाणें खोडून टाकून, निषेधच सुयुक्त ठरविला. सांप्रत जरी त्याला ती सिद्धता, बरावर आठवत नाहीं, तरी आतां त्या गोष्टीविषयीं त्याचा मनाचा निश्चय झाला आहे. याचें नाव तारतम्यविचारशक्ति. अशा रीतीने विचार करून निश्चय करण्यास अवकाश लागतो खरा; परंतु यावरून चांगली खातरी होत्ये, आणि कोणत्याहि गोष्टीचें

तारतम्य करून वास्तविक विचार करण्यास सुलभ पडतें.

सर्व ज्ञान पाहिजे तसें असलें, आणि जर लोकव्यवहारांत आपण नीट चाललों नाहीं, तर आपल्यापासून लोकांस तादृश लाभ होणार नाहीं. यास्तव—

**१२ आईबाप मित्र आणि सोबती यांशीं योग्य रीतीनें वागण्याची सवय ठेवा.**

आपले इष्ट व सुहृद यांशीं वागणें याचीहि सवयच ठेविली पाहिजे. कोणी ह्मणेल कीं ही सवय कशाची व कशी पाडावी? तर असें नाहीं. जरी तुह्मी ही बुद्धिपुरःसर न पाडिली तरी ती पडेलच. जे कोणी विद्यालयीं अभ्यास करीत असतील, अथवा दूर देशांत धंद्याचा उद्देशानें राहात असतील, त्यांस माझें सांगणें इतकेंच आहे, कीं तुह्मी घर सोडून गेलां ह्मणजे जसा तुह्मास तुमचा आईबापांचा लवकर विसर पडून त्यांची हयगय तुमचा हातून लवकर होईल, तशी त्यांचे हातून तुमची होणार नाहीं; कांतर तुह्मी नव्या ठिकाणीं जात आहां अथवा राहातां; तेथे नवेनवे लोकांशीं स्नेह जोडीत असाल. आणि तुमचीं आईबापें घरीं राहून त्यांस तुमचा वारंवार आठवणा येतील. एथे तुह्मी बसत होतां, तेथे खेळलां, हे तुमचे कपडे, असें पाहून वारंवार तुह्मास तीं आठवीत असतील. कधीं सण वार आला ह्मणजे त्यांस तुमचें स्मरण होत असेल; आणि प्रत्यहीं तुह्माविषयीं तीं नाना प्रकारची काळजी वाळगीत असतील. याजकरितां त्यांचें समाधान करण्याकरितां त्यांशीं निरंतर पत्रव्यवहार ठेवणें हा तुमचा धर्म आहे.

स्नेह्यांस वारंवार पत्रें लिहावीं आणि चालेपर्यंत नियमित वेळाने लिहावीं. कारण तसें असलें ह्मणजे परस्परांस पत्राची निरर्थक अपेक्षा करायास बसावें लागत नाहीं. अमुक वेळीं आपल्या मित्राचें पत्र यावयाचें आहे, व अमुक दिवशीं त्यास लिहायाचें आहे, असें आपणास खचित माहीत असतें; तेणेकरून पत्र पाठविण्यास दिनावधि लाविली, असा एकमेकांवर आरोप आणण्याचें कारण पडत नाहीं. जेथे सदोदित पत्रव्यवहारापासून वास्तविक हित वाटत असेल, तेथेच पत्रव्यवहार ठेवावा; आणि तो नियमित काळीं ठेवावा. इतर पत्रव्यवहार कारणवशात् ठेवावा. आईबापांस निदान महिन्यांतून एकदा तरी लिहावें, आणि जाजती लिहिण्याची सवड असेल तरीहि लिहावें. घरीं पत्रें लिहिणें तीं जशीं आपण घरीं सर्व कुटुंबांतील मनुष्यें एकत्र बसून बोलतों, त्याप्रमाणें मोकळ्या मनाने आईबापांस आनंद होई अशीं लिहावीं. बहुधा सर्व पुत्रांचाने अशी वर्त्तणूक करूं शकेल. असें वागलें असतां आपल्यास लिहितां चांगलें येईल, आणि आपल्या अंतःकरणाचा उत्कृष्ट व आनंदकारक मनोवृत्तिहि दृढ होतील.

आतां मित्र कोणास करावा आणि त्याशीं कसें वागावें याविषयीं संक्षेपेंकरून सांगतों. मनुष्याचा प्रकृतीवरूनच दिसतें कीं तो कोणाची तरी मैत्री करील; त्या मित्रांतहि पर्याय असतील; ह्मणजे एक साधारण स्नेही, दुसरा मित्र, तिसरा जिवलग मित्र, अशा निरनिराळ्या कोट्या त्यांत होतील. हें स्वाभाविकच आहे. मित्रत्वामध्यें दोन गोष्टी अवघड आहेत. प्रथम तर, एक खरा मित्र मिळणें कठीण, दुसरें मिळाला असतां त्यास राखणें त्याहून कठीण.

प्रथम उगाच प्रसंगवशात् गांठ पडून ओळख होत्ये; नंतर तीच वाढत वाढत मैत्री होत्ये; असा बहुधा क्रम आहे. बहुत प्रसंगीं असें होतें कीं जे प्रथम आपल्यास मित्र ह्मणवितात, त्यांचा स्नेह फार दिवस राहात नाहीं. याकरितां मित्रांची योजना मोठ्या सावधगिरीने केली पाहिजे; आणि अमुक गृहस्थ हा माझा जिवलग मित्र आहे असें ह्मणण्यापूर्वीं पुष्कळ विचार करून दूरवर दृष्टि ठेविली पाहिजे. दुसरें मित्रांची निवड करण्यामध्यें हें लक्षांत ठेविलें पाहिजे, कीं;—

"सगंतिःसंगदोषेण सतोचमतिविभ्रमा"

तात्पर्य ज्याशीं मैत्री ठेवावी त्याचे गुणदोष आपणास लागतील याजकारितां जे मित्र करणें त्यांमध्यें पुष्कळ गुण आहेत यावरच केवळ नजर ठेवूं नका; तर त्यांमध्यें दोषहि अगदीं कमती असतील असें पाहा. कांहीं पुरुष मित्रांवर फारच भरवसा ठेवितात. त्यांस वाटतें कीं आपले मित्र कधींच आपला त्याग करणार नाहींत, अथवा बदलणार नाहींत. दुसरे कांहीं ज्यांस अनुभव आला असतो कीं वरील दोनहि गोष्टी मित्र करितील, ते असें ह्मणतात कीं मैत्री हें शुद्ध नाव आहे, यांत कांहीं अर्थ नाहीं. अशीं एकपक्षी मतें कधींहि खरीं नसतात. मैत्रीविषयीं एक ग्रंथकार खालीं लिहिल्याप्रमाणें ह्मणतो, त्यांत मोठ्या शाहाणपणाचा आणि मनास वेधकारक अशा गोष्टी आहेत, त्यांवर आपण लक्ष दिलें पाहिजे;—

"गोड बोलण्याने मित्र पुष्कळ जोडतात. आपण दुसऱ्यास आनंद होण्याजोगें बोलिलों, तर आपल्यास लोक तसें बोलतात. सर्वांशीं गोडीने राहावें; परंतु हजारांत ए-

काचाच उपदेश घ्यावा. जर एकादा मित्र जोडणें असेल, तर प्रथम त्याला कसून पाहा, आणि उतावळीने त्यावर भरवसा ठेवूं नको; कारण कांहीं स्नेही कार्यार्थी असतात, आणि आपणावर वेळ आली, तर पाठ देत नाहींत. आपले शत्रूंपासून निराळा राहा; आणि आपले मित्रांविषयीं दक्ष ऐस. खरा मित्र हा एक किल्ला आहे; जाला हा मिळाला, त्याला एक निधीच प्राप्त झाला असें समजलें पाहिजे. खरा मित्र हें एक आयुष्याचें औषधच आहे. जुन्या मित्रास अंतर देऊं नको; कारण नव्याशीं त्याची साम्यता यावयाची नाहीं. नवा मित्र हा नव्या द्राक्षासवासारिखा* आहे; तोच जुना झाला ह्मणजे पिण्यास आनंद होतो. जसें पक्ष्यांला धोंडा मारिला असतां, ते भिऊन जातात, तसें जो आपल्या मित्राची निंदा करितो, तो मैत्रीला पळवितो (ह्मणजे मोडतो). कारण निंदा, गर्व, गुप्तगोष्ट प्रगट करणें अथवा विश्वासघात, याहींकरून सर्व मित्र सोडून जातात."

जाचे योग्यतेविषयीं आपली बुद्धि इतकी निश्चित होऊन गेली आहे; कीं त्याचा मनास लागे अशी वर्त्तणूक आपल्याचाने, आणि अर्थात् आपल्या मनास लागे अशी त्याचाने, करवणार नाहीं, तर अशाचा मात्र स्नेह राहील; बाकीचे मित्र थोड्याच दिवसांचे. अतिशय सलगी आणि दृढ मैत्री हीं एके ठिकाणीं नांदत नाहींत.

जा पुरुषाचे योग्यतेविषयीं तुमचा मनांत विशेष मान्यता नसेल, त्याजवरून तुमची भक्ति लवकरच नाहींशी होईल. कारण मान्यतेनुसार भक्ति बसते. आपल्या मित्राची कितीहि मोठी अब्रू आणि योग्यता असली, तरी त्याविषयीं

*जुने झाल्यावर द्राक्षासव विशेष रुचिकर होतात, असें ह्मणतात.

लेशमात्र हेवा वाळगूं नये; हेंच मित्राचें लक्षण आहे. एक सुंदर ग्रंथकार ह्मणतो, कीं "आपल्या मित्रास आपणाहून अधिक सुख झाल्यापासून आपल्यास आनंद होईल कीं काय, याविषयीं ज्याचा मनांत एकवारहि शंका येऊं शकेल त्याणे या सद्गुणापासून मी दूर आहें असें समजावें."

भूतदया आदिकरून जे अंतःकरणाचे विशिष्टगुण त्यांपासून जे स्नेह पडतात ते निर्मल आणि निरंतर राहाणारे असतात; तसे केवळ बुद्धीचे विशिष्ट गुणांपासून जे स्नेह होतात, ते नसतात, असें आपल्या नेहेमी दृष्टीस पडतें. यावरून असें समजूं नये कीं जेथे विशाल बुद्धि असते, तेथे अंतःकरणसंबंधीहि उत्कृष्ट गुण नसतात. कारण असे दोनहिं गुण कोठे कोठे एके ठिकाणीं असतात याविषयीं माझी खातरी आहे. तथापि वर जो अभिप्राय लिहिला तो यथार्थ भासतो.

मित्रामध्यें मूळ सारासारविचारशक्ति पाहिजे. कोणी मोठी उत्सुकता दाखवील आणि गोंगाट करील, तर त्याचाने आपलें कल्याण करवेल अशी त्याची उत्कृष्ट शक्ति अथवा इच्छा तरी आहे असें समजूं नये; कारण तसें बहुतकरून नसतें. जर आपणास खरें मित्रत्व राखणें असेल, तर जसें आपल्या मित्राने आपणाशीं वागावें असें आपण इच्छित असूं तसें त्याशीं आपण वागलें पाहिजे.

"समानशीलव्यसनेषु सख्यं" हें जरी बहुधा खरें आहे तरी मैत्रीस केवळ आवश्यकच नाहीं. कधीं जे गुण आपणामध्यें नसतात त्यांवर आपली फार श्रद्धा जडते; आणि आपणास असें वाटतें कीं मित्राचे योगाने आपली उणीव पुरी होईल.

मित्र ह्मटला ह्मणजे त्याणे आपले दोष आपणास दाख-

वून त्यांविषयीं निषेध करावा. हाजरी मित्रत्वाचा धर्म आहे, तरी हा मोठा भयंकर आहे. कारण असें करणें हें मोठ्या तजविजीने व प्रेमाने केलें पाहिजे, आणि तेंहि वारंवार करणें नीट नाहीं. एकंदर विचार करितां मला असें वाटतें, कीं आपले दोष काढून छेडणें हें कांहीं मित्राचें योग्य काम नव्हे; तर मोठ्या गहन व्यासंगांमध्यें उत्तेजन देऊन, आपल्यास इतका धीर आणणें कीं आपल्या आवांक्याचा बाहेरहि आपण कामें करायास समर्थ होऊं, असें करणें हा मित्रधर्म आहे. सूक्ष्म नजर देऊन पाहा. जा कुटुंबांत असे दोष काढीत बसण्याचा पाठ आहे, तेथे सुखाची फार करून वस्ती होत नाहीं. जर आपल्या मित्राचें कल्याण व्हावें अशी आपली इच्छा असेल, तर त्यास उत्तेजन द्यावें. त्याजवर प्रसंग आला, तो संकटांत पडला, तर त्यास सहाय व्हावें. जुन्या मित्रांशीं संघटण ठेवावें, आणि नवीनहि स्नेह पाडावे. कारण या नाशिवंत जगांत स्थलांतराने आणि मरणाने इतके फेरफार होतात, कीं जो सांप्रतचा काळांत नवीन स्नेह जोडीत नाहीं, त्यास लवकरच मित्र नाहींसा होतो. जेथे मित्रत्व राखणें, तेथे सत्यावर दृढ आणि अढळ दृष्टि पाहिजे. कारण जाचे खरेपणाविषयीं किंचित् संशय आला-त्याचा सहवास करणें आपणास आवडत नाहीं. याविषयीं एक ग्रंथकार असें ह्मणतो, कीं "वाचेचा अनृतवाहिनी प्रमाणें लोक उपयोग करूं लागले, ह्मणजे प्रत्येक मनुष्याने इतरांपासून विभक्त होऊन, स्वतःचा गुहेमध्यें राहून आपआपल्या मात्र भक्षाची योजना केली पाहिजे." कारण मग मित्राजवळ मागणें अथवा कोणी मित्र आहेसें पाहणें हें व्यर्थ आहे.

याविषयावर मी बरेंच लिहिलें आहे; आणि माझी-

इच्छा अशी आहे, कीं हें ऐकणारानी व पाहाणारानी मित्र जोडावे; ते निवडक व निस्पृह, असे असावे, परंतु आपण प्रीतिपात्र होण्यास आपलीं अंतःकरणें शुद्ध ठेवण्याची सवय ठेविली पाहिजे, नाहीं तर तसे मित्र प्राप्त होणार नाहींत. कोणताहि वृक्ष पुष्कळ जुजरूषेवांचून जगून वाढत नाहीं; परंतु त्याला जपलें तर बहुत वर्षे पर्यंत फळांची समृद्धि होत्ये; तसें स्नेहाचें आहे. कांहीं ऐकणारांचा अनुभवास आलें असेल, कीं कोणी गृहस्थ भेटून त्याणे आपल्यास ह्मटलें, कीं तुमचे वडील व मी मित्र होतों, ह्मणजे आपणास किती आनंद होतो. स्नेहाचे विभागी असल्याने आपला आनंद कमी होत नाहीं, उलटा अधिक होतो. तेंच स्नेही असून आपणास दुःख झालें असतां, त्याचे आपणास वांटेलीं मिळून आपलें दुःख हरण करितात.

हे मित्रजन हो! वरील विवरणांत जाजा **सवर्या** कथन केल्या त्यासर्वांचें ग्रहणकरून, सर्वांनी आपल्या आईबापांशीं, सुहृदांशीं, मित्रांशीं, देशबांधवांशीं व इतरांशीं यथायोग्य रीतीने वागलें असतां, आपल्या स्रष्ट्याचा जो आपणास उत्पन्न करण्याचा हेतु, तो तडीस नेण्यास, ह्मणजे ज्ञानसंपन्न होऊन परोपकार करण्यास; तसेच आपला देश सुधारून सांप्रतचा निकृष्टावस्थेंतून त्यास उत्कृष्टावस्थेंत आणण्यास; आणि सर्व वास्तविक ऐहिक सुखाचा अनुभव घेऊन, पारलौकिक सुखाचे योग्याधिकारी होण्यास, शक्तिमान् व्हावें याहेतूने हा ग्रंथ रचिला आहे. यांतील गुणलेशांचें सर्व सुज्ञ जन ग्रहण करितील ही ग्रंथकर्त्याची आशा आहे.

# अभ्यासाविषयीं.

**सभासदांस**

विनंति करितों, कीं मनुष्यास सवयी कोणत्या असाव्या या विषयावर गतवर्षीं म्या कांहीं विचार सभेस विदीत केले. त्या सर्वांत मूळ एक सवय असली पाहिजे. ती कोणती तर "**अभ्यासाची.**" मागील विवरणांत म्या यथामति प्रतिपादन केलें आहे, कीं कोणत्याहि देशाचा मोठेपणाचे इमारतीचा पाया दोन मजबूद चिऱ्यांचा बांधिला पाहिजे; एक सत्य, व दुसरा उद्योग. या दोहोंसहि अभ्यास पाहिजे. त्या शिवाय त्यांची प्रवृत्ति व त्यांचें दृढीकरण हीं होत नाहींत. साधारण रीतीनें अभ्यास लहान मुलांनी करावा, असा लोकांचा समज पडून गेला आहे. शाळेमध्यें लिहिणें वाचण्याचें कसब शिकून पोटापुर्ती चाकरी मिळविली ह्मणजे अभ्यासाची सीमा झाली. मोठेपणीं अभ्यास कशाला पाहिजे? अभ्यास करून काय मोक्ष साधन आहे? मित्रहो! मी एथे धर्मसंबंधी संभाषण करून तुमचा नियमांचें उल्लंघन करीत नाहीं, परंतु इतकेंच सांगतों कीं अभ्यास, आणि त्यापासून उत्पन्न झालेली चित्तैकाग्रता, यांची दगडफोड्यापासून राजापर्यंत सर्व अवस्थांमध्यें आवश्यकता आहे.

संस्कृत भाषेचें तादृश ज्ञान कमी, या मुळें त्यांतील ग्रंथांतरींचे दाखले मी एथे पुष्कळ देऊं शकलों नाहीं; परंतु जे जे दिले आहेत, ते बहुधा अनुभव घेऊन दिले आहेत.

परंतु आपल्या कार्यास प्राचीन इतिहासच कशाला पाहिजे! उदरनिर्वाह झाल्यावर अभ्यासाची काय गरज, अथवा आह्मास अवकाश नाहीं, असें जे ह्मणत असतील, त्याणी आपल्या बाजूस **ब्रिटिश** लोकांकडे पाहावें. मी जर फार उदाहरणें द्यावयास लागलों, तर सर्व वेळ त्यांतच निघून जाईल ह्मणून थोडींच देतों. प्रथम एक **सर विलियम् जोन्स** हा **बंगाल** इलाख्यांत **ज्यड्ज्य** असून, आपलें काम करून, नानाप्रकारचे विषयांवर **गवर्नर जनरल** यास अभिप्राय देत असतां याणे किती अभ्यास केला. **एशियाटिक् जर्नल्** यामध्यें निबंध, **मनुस्मृतीचें भाषांतर**, नाटकांचीं भाषांतरें असे अनेक उपयुक्त ग्रंथ केले. तसाच प्रख्यात् ***प्रोफेसर हेमन् हारेस् विल्सन्** हातर सर्वांहून श्रेष्ठ मानिला पाहिजे. हा धंद्याने डांक्तर (ह्म० वैद्य) असतां याणे बहुत भाषांचा अभ्यास केला. संस्कृतांत इतका निपुण आहे कीं **ऋक्संहितेचें** कांहीं इंग्लिश भाषांतरहि याणे केलें आहे. शिवाय त्याणे अनेक ग्रंथ केले आहेत, त्यांतून एक एकच पाहिला तरी कोणी मोठ्या विद्वानाचें नाव निरंतर राही असें करण्याजोगा आहे, असें ह्मटलें असतां चालेल. तसेंच **प्रिन्सेप्, कोलब्रूक्, स्प्रेंजर, सर हेनरी एलियट्** इत्यादि, याणी नानाप्रकारचा भाषा संपादन करून मोठमोठीं उपयोगी कृत्यें केलीं. इकडेहि तसेच *जनरल **वान्स केनडी, एल्फिनस्टन्, मालकम्** इत्यादि याणी केवळ राजकीय कामें केलीं, आ-

---

* हीं दोन नावें मागाहून घातलीं आहेत.

णि तरवार मारिली, इतकेंच नाहीं, तर आणखीहि स्वतः उद्योग करून लोकोपकारार्थ अनेक ग्रंथ केले.

माझा बोलण्याचा आशय हाच, कीं केवळ पोटापुरतें मिळवून स्वस्थ बसूं नये, तर त्यानंतरहि सर्वांनी यथामति यथाशक्ति आमरणांत अभ्यास करून उपयुक्तता संपादावी व उद्योग करावा.

आतां पुढील अभ्यासाविषयींचे विचार हे जरी शाळेंतील विद्यार्थ्यांस मुख्यत्वेंकरून लागू होतात, तरी सर्वांनी (मला क्षमा करून) असा विचार केला पाहिजे, कीं शाळा ही मार्ग दाखविण्याकरितां आहे. वास्तविक शाळा ह्मणजे हें जग आहे, आणि वास्तविक अभ्यास ह्मणजे जो-शाळा सोडिल्या नंतर आपण करूं लागतों तो. विद्या ह्मणजे ज्ञान. तें मिळविणें, हें काम शेवटपर्यंत चालणारच आहे, कारण आपल्या परिमित आयुष्यांत अपरिमित ज्ञानसागर काय आपण उल्लंघन करणार आहों! याकरितां आपण सर्व विद्यार्थी आहों, असें मनांत आणून पुढील व्याख्यान ऐकावें.—

अभ्यास करणें हें ह्मणणें सोपें आहे. ही अभ्यासास बसायाची खोली, हीं पुस्तकें, हीं बसायास व लिहायास इंग्लिश विद्यार्थी असेल, तर खुर्चा, टेबलें, अथवा कोणी एतद्देशीय विद्यार्थी असेल, तर रुमाल, कलमदान, अथवा पुस्तकें; इतकी तयारी असल्यावर मग काय पाहिजे? तर इतकेंहि जरी झालें, तरी अभ्यास कसा करावा हें समजायास पाहिजे. जरी एकाद्या अभ्याशास कांहीं काळजी नसली, अथवा त्याजवर कांहीं ओझें नसलें, तरी त्याचा व्यासंगामध्यें पुष्कळ अडथळे येतात, तेणेकरून प्रसंग-

वशात् त्याला फार त्रास होतो. कोणे वेळीं आपण दुखणाईत असतों; कधीं आपणास अस्वस्थता होऊन, आपली रुचि अभ्यासावरून उतरून जात्ये, आणि आपली उत्साहशक्ति इतकी कमी होत्ये, कीं आपलें मन आपल्याचानें थाऱ्यावर आणवत नाहीं; कधीं कधीं कोणास व्यासंगाच्या चांगल्या रीति माहीत नसतात; कोणी निरुपयोगी ग्रंथ वाचण्यामध्येंच वेळ घालवितात; या सर्व गोष्टी व्यासंगाचे आड येतात ह्मणून लक्षांत ठेविल्या पाहिजेत. परंतु सर्वांहून मोठा अडथळा तो हाच आहे, कीं अभ्यास करितांना आपले विचार भलतीकडेच जातात आणि ते आपल्याचानें पूर्वस्थलावर आणवत नाहींत. हें कारण दूर करण्याकरितां चित्तनिरोध केला पाहिजे. त्याविषयीं **ज्ञानप्रसारकाचा** दोन अंकांत कांहीं विवरण केलें आहे. आतां असे व्यासंगास अनेक अडथळे येतील हें लक्षांत ठेवून, अभ्यासाचे क्रमाचा निश्चय केला पाहिजे. कारण साधारण स्थितीमध्यें ह्मणजे प्रपंचव्यावृत्तींत मनुष्य पडला, ह्मणजे त्याला कधीं कधीं चारचार दिवसांत निर्वेध दोन घटिकाहि मिळत नाहींत. हें आश्चर्यकारक वाटेल परंतु असें आहे. तेव्हां शाळा ही लहानसें जग कल्पून, जसें पुढें व्यवहारांत शिरल्यावर कालक्षेप करावा लागेल, त्याप्रमाणें पूर्वींच अभ्यास केला पाहिजे. यास्तव मनास अशी सवय लाविली पाहिजे, कीं व्यासंगांत कांहीं उपाधि येऊन अडथळा झाला असतां, जेथपर्यंत आपलें अनुसंधान आलें होतें, तेथे लागलेंच मनानें उलटून लागावें, आणि आपला विचाराचा क्रम चालवावा. अशी शक्ति जंववर तुमचा अंगीं आली नाहीं, तंववर तुह्मी प्रपंचाचा उपयोगी नाहीं;

जितकी ही तुमचा अंगीं येईल तितक्या लहानसहान उपाधि तुह्मास भारी वाटणार नाहींत. परंतु असें होण्यास दृढतम अभ्यास पाहिजे. जसा पूर्वी आपले ऋष्यादि करीत असत; जसा हल्लीं **ब्रिटिश व अमेरिकन्** तत्ववेत्ते करितात. असा अभ्यास कसा करावा याविषयीं एका ग्रंथाधारें मी कांहीं सूचना करितों.

**१ नित्याभ्यासाचें कालमान.**

याविषयीं सर्वसाधारण नियम करूं शकवत नाहीं. हें प्रत्येक मनुष्याचा प्रकृति मानाप्रमाणें निरनिराळें असलें पाहिजे. कोणी तीव्र बुद्धीचा असला, तर त्याचा थोडे तास अभ्यास करून निर्वाह होईल. जो थंड आहे त्याला बराच वेळ लागेल, आणि बहुधा अशास पुष्कळ वेळपर्यंत व्यासंग करण्याचा कंटाळाहि येणार नाहीं. उदयापासून अस्तमानापर्यंत सरासरी अभ्यास करीत बसणें, त्याहून निकट चित्त लावून थोडा वेळ अभ्यास करणें हें मला बरें वाटतें. बहुधा दिवसास साहा तास प्रमाणें अगदीं मनाचा होईल तितका निग्रह करून व्यासंग केला असतां पुरे, असें मला वाटतें. असा व्यासंग जो करील तो आपल्या विद्येमध्यें, अथवा कसबामध्यें नाव काढील यांत बहुधा संशय नाहीं. परंतु हा अभ्यास कितीं कठीण असला पाहिजे, तर जितका आपल्या बुद्धीचानें सहन करूं शकवेल तितका. त्या व्यासंगाचा वेळीं विद्यार्थ्याचें अंतःकरण केवळ अभ्यसनीय विषयांत निमग्न होऊन बाकी जगाचें भानाहि त्यास राहूं नये. जसा एकाद्या जाड कांचेपासून विस्तव पाडायाचा असला, तर त्या कांचेवर सूर्या-

चे किरण पाडून त्याकिरणांचें सर्व तेज एका **फोकसांत*** आपण आणितों, तसें आपलें सर्व मन त्या विषयांत गुंतविलें पाहिजे. असें केलें असतां किती लवकर अभ्यास होतो याविषयीं तुह्मी अनुभव घ्याल तर तुह्मास अश्चर्यच वाटेल. कितीहि विषयांत काठिन्य असलें तरी आशा अभ्यासानें सर्व वितळून जातें, आणि मग जें पूर्वीं बर्फ होतें तें पाणी होतें. उगाच कालक्रमण करण्याकरितां अथवा दुसऱ्या अभ्यासाचा कंटाळा आल्यामुळें विसाव्याकरितां जें तुह्मी वाचाल तो व्यासंग ह्मणूं नका, कारण तो व्यासंग नव्हे. दुसरें जो अभ्यास करायाचा तो जितका सकाळचे वेळीं होईल तितका करीत जा. कारण त्या वेळीं चित्त स्वस्थ असतें प्रातःकाळीं अभ्यास करावा याविषयीं प्राचीन ग्रंथांतरीं पुष्कळच वर्णन केलें आहे आणि याकरितां पूर्वीं कालनियमन सांगते वेळीं प्रातः उठण्याची सवय ठेवावी याविषयीं पुष्कळ विवेचन केलें आहे.

## २ अभ्यासाचे वेळीं शरीराची व्यवस्था नीट ठेवा.

सांप्रत बहुधा इंग्रजी लीपि व भाषा शिकण्याकडे बहुत लोकांचा कल आहे, त्याकरितां तद्द्वारा अभ्यास कसें बसून करावा त्याविषयीं **डाक्टर टाड्चा** अभिप्राय सांगतों. कांहीं लोक लहानपणापासून नीच साध्या टेबलाजवळ बसून अभ्यास करण्याची सवय पाडितात. असें करूं नये. कारण तेणेकरून मोठेपणीं खांद्यापासून कमरेपर्यंत शरीर अधिक अशक्त होत जातें; आणि मग पोंक आणून बसण्याची

*हा इंग्रेजी शब्द एथें घातला याची वाचणारानीं क्षमा करावी. यास मराठी शब्द योजून तितका अर्थ माझाने आणवत नाहीं व याचा इतक्या अर्थव्यापकतेचा शब्द अन्य ग्रंथींहि पाहिला नाहीं.

सवय लागते. बहुधा विद्वान् लोकांस साफ उभें बसतां अथवा चालतां येत नाहीं. जर प्रथमच उभें राहाण्याचा अभ्यास ठेविला, तर उभें राहून अभ्यास करणें हें चांगलें. लिहिणें, भाषा शिकणें, बहुतेक प्रकारचें गणित करणें, या अभ्यासास एके ठिकाणीं राहावें लागतें. त्यांतून जर कांहीं वेळ बसून आणि कांहीं वेळ उभ्यानीं अभ्यास करितां येईल तर उष्ण देशांत फार चांगलें; परंतु या दोहोंमध्यें उभें राहून अधिक झाला पाहिजे; कारण जसजसे तुह्मी मोठे व्हाल तसतसे स्वाभाविकच तुह्मी अधिकाधिक बसूं लागाल. चाळीस वर्षांनंतर बहुधा थोडेच पुरुष उभ्यानीं पुस्तक घेऊन वाचणारे मिळतील. कांहीं लोक एक सुखदायक खुर्ची करवितात आणि तिचा एका बाजूवर कागद ठेवून लिहिण्याचें करितात. असें अगदीं करूं नये. कारण तसें केलें असतां, शरीर पिळवटलें जाऊन त्यापासून विकृति होते, आणि पुष्कळ ठिकाणीं देहांतहि होतो. बहुधा टेबल कलदार असावें, आणि तें अशा रीतीनें ठेवावें, कीं आपले डोळ्यांवर मागाहून उजेड पडे. असें केल्यानें डोळ्यांस पुष्कळ विश्रांति मिळते. तसेंच रात्रीस दिव्याचा प्रकाश आपल्या डोळ्यांवर नपडतां नुसत्या पुस्तकावर पडे, असें झालें पाहिजे. जेथपर्यंत आपला पाठ दिवसास पार पडेल तेथपर्यंत पाडावा, आणि जितकी डोळ्यांस इजा कमी देववेल तितकी कमी द्यावी. डोळ्यांस मेहेनत नपडे याकरितां आपआपले पाठ तुह्मी पूर्वींच तयार करून ठेवाल अशी मी अपेक्षा करितों. ज्याचे डोळे अधु असतील, त्याणे प्रकाशाची ज्योति त्यांवर पडूं देऊं नये आणि रात्रौ निजते वेळीं तसेंच सकाळीं उठल्यावर प्रथम

थंड पाण्याने धुवावे. कसोंहि अभ्यास करीत असलें तरी शरीर उभार ठेविलें पाहिजे. छातीशीं बांक आणणें हें तर सर्वथैव वर्ज करावें.

अभ्यास करितेवेळीं आपला पोषाग ढिला असावा. एवढ्या कामास आमचा लोकांची पोषागाची रीति सुयुक्त आहे. कारण बहुतकरून कोणत्याहि शरीराचा भागावर अतिशय जोर येतो असें नाहीं. परंतु याविषयीं दोन गोष्टी जा अलीकडे शिरल्या आहेत, त्यांणी आपल्या मागील चालींस बरें ह्मणायास केलें आहे. त्यांतून एक कोणती तर मोठीं पागोटीं घालण्याची चाल. कोणे समयीं तुह्मी ऐकिलें असेल, कीं एक दुसऱ्यास ह्मणतो "कायरे तुझें पागोटें ? हें काय पागोटें कीं टोपलें[1]!" त्यास तो प्रत्युत्तर देतो "तुझा छत्रीपेक्षां बरें[2]!" असा ग्रंथांतरीं लेख जर कोणी कालांतरीं वाचील, तर त्यास ही अतिशयोक्ति वाटेल. परंतु आपणास प्रत्यक्ष अशीं हल्लीं बहुत उदाहरणें दिसताहेत. तर अशीं मोठीं जड पागोटीं घातल्यापासून काय शोभा व सौख्य वाटतील तीं वाटोत, परंतु त्यांपासून शरीरास हित नाहीं. दुसरी कांहीं लोकांची तंगदार कपडे घालण्याची चाल असत्ये, तिजपासूनहि इजा होत्ये. अभ्यासाचावेळीं ढिला पोषाग असावा; असा कीं शरीराला तिळप्राय तंगी होऊं नये. आपण व्यासंग करितेवेळीं शरीरहि निश्चल आणि मोकळें ठेवावें, असें कीं त्याचा मनास उपद्रव होऊं नये; इतकें मात्र निश्चल होऊन बसूं नये, कीं निद्रेला आपणास आलिंगन देण्यास संधि सांपडेल.

मराठी लिहिण्यास खुर्चीवर बसून साधेल, तर फार चांगलें.

---

१ व २ यांचा लहानशी टोपली व लहानशी छत्री असा अर्थ घ्यावा.

बुरमांडी घालणें, दोन्ही गुडघे वर घेऊन लिहिणें, अशा जा या बसण्याचा रीति आहेत, त्याणीं एक तर शरीरास श्रम फार होतात, आणि दुसरें आपलें चांचल्य कमी होऊन हुशारी जाय़े. पाहा, बहुधा कारकून आणि छापखान्यांतील लेखक यांचा शरीराची कशी दशा होय़े ती!

**३ अभ्यास करणें तो पुरा करावा.**

अभ्यास करणें हें जसा कांहीं देश जिंकणें यासारिखें ह्मटलें असतां चालेल. जसें एकादा देश जिंकीत असतां जें कांहीं आडवें येईल तें अगदीं पराजित करून टाकिलें, तर मग एकामागून एक जयच होत जातील. परंतु जर एथे एक लहानशी गडी, तेथे एक किल्ला, पुढें एका ठिकाणीं एक नाकेदारीची स्वारांची चौकी, अशीं ठिकाणें मागें जशींचा तशींच राहूं दिलीं, तर लवकरच शत्रु आपल्या पाठीवर येईल आणि जो मुलुक एकदा घेतला तो पुनः जिंकावा लागेल. याचप्रमाणें अभ्यासाचें आहे.

जरी आपल्या शरीरसुखाचा संबंधानें विचार केला, तरी जो अभ्यास करणें तो पुरा असावा यांत लाभ आहे. कारण वरवर पाहायाची सवय असल्यानें वारंवार त्रास उत्पन्न होतो, आणि आपली आपणासच समयविशेषीं लज्जा वाटूं लागत्ये. याकरितां जो विषय पाहाणें तो पुरा पाहावा. असें पाहूं लागलें असतां आपली गति प्रथम अगदीं मंद चालेल; परंतु तसें झालें तरी चिंता नाहीं, कारण आपणास दूरवर जावयाचें आहे. तेव्हां प्रथम जें शिकणें तें हळुहळु परंतु पकें करीत गेलें असतां, एकंदराखालीं शेवटीं आपलें हित होईल. कितीएक लोक मुळचे कुशाग्रबुद्धीचे

असून, वरवर विषय पाहात गेलें असल्यामुळें शेवटीं पस्तावतात; कारण त्यांस समयास विषयाची स्फूर्ति होत नाहीं. असा पुरुष **इंग्रेजींत** शिकलेला असला, तर प्रसंगीं कांहीं वादविवादांत कोणाग्रंथकाराचा दाखला देतो, आणि ह्मणतो कीं "**बर्क** * असें ह्मणून या मताचें उपपादन करीत नाहीं काय हो?" तेव्हां जवळ कोणी पुरा शिकलेला असला तर तो ह्मणतो कीं "असा त्याचा अभिप्राय, असें मी समजलों नव्हतों." तेव्हां मग या वरवर विद्वानास खालीं मान घालून ह्मणावें लागतें, कीं मला तो ग्रंथ पाहिल्यास बरेंच दिवस झाले ह्मणून आतां चांगलें स्मरण राहात नाहीं. तसेंच एकादा वरवर पाहाणारा शास्त्री सभेंत बसून वादविवाद करितांना सहज बोलून जातो "काय हो **धोंडशास्त्री** बावा! "**इयं नारदोक्तिः**" (ही **नारदोक्ति**)!" **धोंडशास्त्री** हा बिचारा भोळा परंतु खरें जाणें त्यास प्रत्युत्तर देतो "नहि, अयं प्रश्नो **व्यवहारमयूखे** प्रतिपादितः" (ह्म० या प्रश्नाचें **व्यवहारमयूखांत** प्रतिपादन आहे.) मग शास्त्रीबावांस अधोमुख करून फडसंपादनार्थ ह्मणावें लागतें "होहो!! खरें तें, काय हो ग्रंथोपस्थिति नाहीं, यामुळें संचार जातात." आतां या वरवर पाहाण्याऱ्यांची जनांत फजीती, आपल्या मनास खंती अशी झाली कीं नाहीं? तरी अशा लोकांस अशी सवय लागून गेलेली असत्ये, कीं पुनः पुनः जो विषय पाहाणें तो वरवरच पाहातात. याविषयीं एक **हरिकेशवजीकृत नीतिग्रंथामध्यें प्रोफेसर पोर्सन** आणि एक **गार्विष्ट विद्यार्थी**, यांची गोष्ट आहे ती आपल्या लक्षांत असेलच.

---

* एक **इंग्लंडांत** मोठा वक्ता होता.

आतां पाहा बरें, कितीहि अटकळी पेक्षां वास्तविक माहिती जिची आपणास खातरी आहे, ती थोडी असली तरी किती बरें चांगली ! एक पाठ अथवा एक पुस्तक पुरें खांचीखोंचीसुद्धां शिकलें असतां, त्यांत अर्धवट वरवर पाहिलेल्या दहा पाठांचें अथवा दहा पुस्तकांचें श्रेय येईल.

जर एकाद्या कल्पनेचें उद्घाटन करायाचें असेल अथवा कांहीं विषयाची पूर्त्तता करून घेणें असेल, तर तें काम पुरें झाल्याशिवाय सोडूं नका. जितक्या रीतीनीं त्या प्रकरणीं शोध करवेल तसा करीत जा. ग्रंथांतरीं लिहिणें झाल्यास थोडक्यांत व उत्तम रीतीनें बोध होण्याजोगें लिहा. त्याचें विवेचन करणें, तर जे जे ग्रंथकार त्या प्रकरणीं लिहीत गेले असतील, त्यांस हुडकून काढा, कारण तुह्मास सुचल्या नाहीं, अशा त्यांणी कांहीं युक्ति लिहिल्या असतील. तसेंच त्या विषयामध्यें जा जा गोष्टी येतील त्यांचें तारतम्य करीत जा. याप्रमाणें जो जो विषय पाहाल तो तो पुरा पाहात गेलें असतां, तुह्मास ग्रंथसमुदाय थोडा अवगत होऊ; परंतु तुह्माजवळ उपयुक्तज्ञानसंचय लवकर होईल. अभ्यास करीत असतां जीं जीं प्रकरणें येतील त्यांचा निर्णय न करणें, आणि मनाची पूर्त्तता न करून घेणें, हें अर्धबोबड्या विचारांचें बाप आहे; याची प्रजा गोंधळ, आणि त्याशीं जो संघटण ठेवील, तो पोकळभारथी होऊ, पंडित नव्हे.

**४ शुष्क व कठीण अभ्यासाची सवय ठेवा.**

एकास जो अभ्यास जड जातो, तो दुसऱ्यास सोपा वाटतो. दुसरें असें होतें, कीं जो अभ्यास आज सोपा वाटतो, तोच दुसरे वेळीं दुःसह त्रासदायक वाटतो. या

चें कारण मनाचें दृढ आकलन आपल्याचोने होत नाहीं. जर आपल्या चित्ताचा आवर आपल्या हातीं असता, तर सार्वकाल—जा वेळीं प्रकृति अस्वस्थ असेल ती वेळ खेरीज करून—अभ्यास एकसारिखा सुलभ वाटता. जाणे अनुभव घेऊन पाहिला असेल, त्यास समजलें असेल, कीं थंडीचा दिवशीं, अथवा बाहेर पाऊस पुष्कळ पडून जिकडे तिकडे हवा थंडगार झाली, ह्मणजे आपल्यास अभ्यास करायास किती हुशारी येत्ये! आणि बाहेर कोठे जावयाचें नसतें यामुळें व्यासंगावर मन कसें लागतें! तेंच वसंत ऋतूमध्यें सृष्टीचा स्वाभाविक रमणीय शोभेमुळें व ग्रीष्म ऋतूमध्यें उन्हाळीमुळें शरीर शिथिल होऊन, अभ्यासावर मन लागतच नाहीं. याकरितां प्रत्यहीं पुष्कळ तास पर्यंत अभ्यास करायाची सवय पाहिजे, ह्मणजे सकाळ, दोन प्रहर, संध्याकाळ, व रात्र, या सर्व वेळीं मनाने सारखें तयार असावें. तसेंच जेव्हां अभ्यासाचा स्वाभाविक कंटाळा येतो, अशा ऋतूंत, जेव्हां मन थकून जातें, आणि शरीर हलख अथवा दुखणाईतहि असतें, अशा वेळींहि, अभ्यास करण्याची तयारी ठेविली पाहिजे. कारण एक ग्रंथकार ह्मणतो, "दुसऱ्या वस्तु शक्तीचा बळाने घेतां येतील, अथवा पैसा खर्चून प्राप्त होतील, परंतु ज्ञान हें अभ्यासानेंच साध्य केलें पाहिजे."

चित्तावरोध करण्याची शक्ति असल्याने इतकें हित होतें, कीं ईश्वरेच्छेने जे अंध होतात, त्यांस त्या योगें जी चित्तावरोध करण्याची शक्ति येत्ये, त्यामुळें डोळे असतां जे सुंदर, रमणीय व आनंदकारक पदार्थ पाहिल्याने आनंद होई, त्याचा बदला त्या शक्तीने ते सुखी होऊन संतुष्ट

असतात. ह्यूबर्ट साहेब ह्मणून एक महान् विद्वान् होऊन गेला, तो आपली दृष्टि गेली ही ईश्वरी कृपा मानीत असे; कारण तेणेकरून त्याला चित्ताचें आकलन करणें सुलभ पडे, आणि विचार करावाच लागे. कोणी प्रख्यात विद्वान् लोकांविषयीं बोलतां बोलतां आपल्या मित्रास ह्मणतो "कायहो, तो अमुक अमुक मोठा नामांकित होऊन गेला! शाळेंत असतां तर विद्वत्तेविषयीं अथवा दुसऱ्या कोणत्या गोष्टींविषयीं त्याची प्रख्याति नव्हती. त्याला कोठे गुरूपगुरूंमध्यें जागा नव्हती आणि वर्गांतहि प्रख्यात नसे." तर मी त्या मित्राचे वांटणें ह्मणतों, कीं इतक्याहि गोष्टी खऱ्या नसतील असें नाहीं; परंतु कसेंहि असलें, तथापि एका गोष्टींविषयीं खातरी ठेवा, कीं केव्हां तरी चित्त लावून शुष्क आणि कठीण व्यासंगाचा दीर्घ क्रम चालविल्यावांचून तो एवढा प्रख्यात विद्वान् झाला नाहीं. कदाचित् लहानपणीं असा व्यासंग त्याणे केला नसेल, आणि असें असेल, तर मोठेपणीं त्यास अधिक श्रम पडले असतील; परंतु त्या श्रमांवांचून गत्यंतर नाहीं, आणि ते केले ह्मणूनच तो असा विद्वान् झाला असें समजा. एकाग्र चित्ताने श्रम केल्याने अशीं फलें होतात, अशी या चित्ताची विलक्षण शक्ति आहे.

कांहीं विद्यार्थ्यांचें ह्मणणें असतें, (आणि आपण सर्वच वास्तविक पाहिलें असतां विद्यार्थी आहों) कीं ज्या अभ्यासापासून आह्मास पुढें प्रपंचांत काडीमात्र उपयोग व्हायाचा नाहीं, अशा अभ्यासांत आमचा वेळ व्यर्थ घालवितात. एक ह्मणतो मी व्यापारी होणार मला या लाटिन् व ग्रीकामध्यें वर्षांचीं वर्षें घांसून काय करायाचें आहे ? दुसरा ह्मण-

तो मी वैद्यक शिकणार, मला ही महिन्यांचे महिने शंकुछि-न्न आणि शून्यलब्धीशीं कपाळकूट कशास पाहिजे ? ति-सरा ह्मणतो मी कारकून (रैटर) होणार, मला हें "**रामो हरिः करी भूभृत्**" कशाला पाहिजे ? पुष्कळ अशीं गा-ऱ्हाणीं गातात, कीं आमचा गुरूंस कांहीं समजतच नाहीं; जा वस्तूंचा पुढें कधींहि आह्मास उपयोग पडणार नाहीं, त्यांचा जुलमाने आह्माकडून हे अभ्यास करवितात. अशीं गाऱ्हाणीं गाणारांस शिक्षेचा उद्देश अगदींच माहीत नसतो. सर्वांनी असें लक्षांत ठेविलें पाहिजे, कीं पुढील प्रपंचामध्यें चांगल्या रीतीने वागण्या जोगी उपयुक्तता आपल्या मनबुध्यादिकांमध्यें येई असें करणें हा शिक्षणाचा उद्देश आहे. असें होण्यास सांप्रतचा अभ्यसनीय विषय शुष्क व कठीण असला, आणि मनोरंजक नसला, तरी चिंता नाहीं. पुढें त्यांतून एकहि गोष्ट तुह्माला उपयोगी पडणार नाहीं असा कदाचित् असला, तरी चांगला. कारण शुष्क कठीण आणि मनोरंजक नव्हे, असा विषय ग्रहण करून जिरविण्याविषयीं जर मनावर कहर कराल, तर मग तें जन्मभर तुमची आज्ञा मानून, जें जेव्हां तुह्मी सांगाल तें करायास सिद्ध होईल. याजकरितां जाला कठीण अभ्यासाने आपले मनास असें शिकवायाचें असतें, आणि दीर्घ विचार करण्याची सवय मनास लावायाची असत्ये, तो आपल्या अभ्यसनीय विषयाविषयीं घासघीस घालीत नाहीं. कारण जा गोष्टींची व्यवहारांत आपणास गरज लागेल, त्या ग्रहण करण्याजोगें तुमचें मन तयार झालें, ह्मणजे मग जेव्हां त्यांची गरज लागेल, तेव्हां शिकायास पुष्कळ वेळ मिळेल.

वरील गोष्टींचें आणखी स्पष्टीकरण करितों. असा वि-

चार करा कीं एक विद्यार्थी सांप्रत भूमिति शिकत आहे; आणि पुढें त्याचा धंदा निराळा पडून त्यांत तो इतका निमग्न होईल, कीं सर्व भूमितीचे सिद्धांत विसरून जाईल, आणि कदाचित् पुस्तकाचें नाव मात्र त्याचा ध्यानांत राहील. आतां सहजच असा प्रश्न उत्पन्न होईल, कीं "तर मग भूमिति शिकण्यापासून लाभ कोणता ?" तर असें नाहीं; फ्लेटो* आणि दुसऱ्या जा विद्वानाहीं भूमितीचा अभ्यास केला आहे, ते सांगतात कीं या अभ्यासानें आपली बुद्धि दृढ होये, आणि कोणत्याहि विषयावर समर्पक विचार करण्याची शक्ति येये. तसेंच भूगोलवर्णन आणि कालज्ञान यांची तुह्मास आतां गरज वाटत नाहीं; परंतु, जेव्हां तत्वविद्येचा कोणीकडे कसकसा कधीं कधीं प्रसर होत गेला याचा जेव्हां तुह्मी शोध कराल, तेव्हां आणि मोठे मोठे ग्रंथ वाचून त्यांत जे हवाले दिले असतील अथवा तुलना केल्या असतील त्यांतून योग्यायोग्याचा विचार कराल, तेव्हां त्या दोहोंचा उपयोग पडेल. तत्वविद्येने तर मनास अंतर्बाह्य दृष्टि प्राप्त होये. तिचा योगानें सर्व सृष्टीचें आधिपत्य मिळून, जगत्कर्त्याकडे आपली दृष्टि लागत्ये. या सर्व व्यासंगानें मन उदार होतें; असा व्यासंग न केला असतां मनास वास्तविक महत्व अथवा रस हीं येणार नाहींत.

एका ग्रंथांत म्या एक प्राकृत दृष्टांत पाहिला, तो जरी रूपानें दीन दिसतो, तरी चातुर्यानें मोठा आहे असें मला वाटून त्यांतील तात्पर्य मी एथे ग्रहण करितों. "एक बाई एका दिवशीं देवळांतून कथा ऐकून घरीं आली, तेव्हां

* एक युनानी तत्ववेत्ता, जाला फार्सीमधें फलातून ह्मणतात.

तिचा शेजारी तिची हेलना करण्याचा उद्देशाने विचारितो, अहो बाई! तुह्मी नित्यनित्य कथेस जातां, आज काय हो हरिदासाने अनुसंधान लाविलें होतें? ती ह्मणाली तें मला ठाऊक नाहीं. तर मग तुमचे जाण्याचें तात्पर्य काय! ती आपल्या बागांतील झाडांकडे बोट दाखवून उत्तर करित्ये; या झाडांस माळी प्रत्यहीं शिंपित्येवेळीं त्यांचीं अळीं भरितो, तें पाणी झाडांजवळ राहात नाहीं, निघून जातें; परंतु झाडें दिवसेंदिवस वाढत जातात'. तो शेजारी लज्जित होऊन निघून गेला."

अभ्यास करणारांस माझें दुसरें एक सांगणें आहे, कीं अभ्यासाचा जो नित्यक्रम असेल, तो 'अव्याहत चालूं द्या. याविषयीं एक सुंदर ग्रंथकार ह्मणतो, कीं "जा तरूणपुरूषाची स्वतः अमुक करावें अशी निश्चित बुद्धि नसत्ये, त्याची बहुधा चाल अशी असत्ये, कीं प्रथम एका मित्रास सलाह विचारावी, आणि त्याप्रमाणें कांहीं वेळपर्यंत चालावें; नंतर दुसऱ्यास विचारावी, आणि पहिला मार्ग सोडून दुसऱ्यास अनुसरावें. नंतर तिसऱ्यास विचारावें; इतकेंहि करून शाश्वत नाहीं, पुनः बदल आहेच. परंतु अशा प्रत्येक बदलेण्यापासून अधिकाधिक अनहित होत जातें. लोक तुह्माला सांगतील, कीं अमुक उद्योग तुमचाने होणार नाहीं, तमुक होणार नाहीं, तर त्यांचें ऐकूं नका. बहुधा जो उद्योग मनोनिग्रहाने आणि तत्परतेने चालवाल तो तुमचाने होईल. कोणी एक धंदा करण्यास उपयोगी पडण्यापुरता त्यांतील कांहीं अंश शिकण्यास, साधारण बुद्धि पुरे; आणि कदाचित् जरी समज मंद असला, तर उलटा उपयोग होईल. साधारण बुद्धीपेक्षां विशाल बुद्धि आपल्या धन्यास कमी उपयोगी पडत्ये

असेंच नेहेमी होतें. आयुष्याची घोड्यांचे शरतीशीं तुलना करितात; त्यांमध्यें जे घोडे अति चपल असतात ते आवरायास फार कठीण असतात, ही गोष्ट जर मनांत आणिली, तर वरील दृष्टांत फारच शोभतो."

कोणी असें ह्मणतात काय करावें ? आमचाने कठीण व्यासंग कसा होतो! आमचे दिवसच प्रतिकूल आले. तर अशा ह्मणण्यापासून दूर राहिलें पाहिजे; कारण असें ह्मणून कठीण व्यासंग नकरण्याची सवड काढणें हें नीट नाहीं. साधारण लोकांचा असा समज आहे, कीं जसे दिवस येतात तसे आपण वर्त्ततों; आपले दिवस आले, ह्मणजे तदनुसार आपली वर्त्तणूक होत्ये; आणि बहुधा सर्व लोकांवर तसें ओझें येऊन पडेल, तर तेहि मोठे, निग्रहशील, आणि कर्त्ते होतील. आतां बहुधा मनुष्य स्वभावतः आळशी आहे; त्याला कांहीं उद्योग करायास नको; त्याला उद्योगास लावण्यास मोठीं उत्तेजक कारणें पाहिजेत; त्याची बुद्धि जागृत करून त्यास श्रम करण्यास प्रवृत्त करायाला याजवर मोठें ओझें पडलें पाहिजे; या बहुतेक गोष्टी खऱ्या आहेत. पाहा बहुतेक लोकांचा हातून कांहीं होत नाहीं. परंतु करूं गेलें असतां कांहीं होईल कीं नाहीं, हें पाहिलें पाहिजे. लोक ह्मणतात कीं प्रसंग पडला ह्मणजे आपण काम उठवितों. दिवस आले ह्मणजे आपण उद्योग करितों. असें असेल; परंतु तसें ह्मणून बसण्यापेक्षां असें ह्मटलें तरी काय चिंता आहे, कीं चला, आपण उद्योग करून चांगले दिवस आणूं.

**जान मिल्टनाचा*** स्थितीचा विचार करा. त्यास ए-

---

* एक **इंग्लिश** कवि पहिल्या **चार्लसाचा** वेळीं झाला.

वढ्या महत्वास येण्यास त्याचा स्थितीमध्यें एवढी काय अनुकूलता होती. उलटा अंध होऊन गेला होता, त्यामुळें त्याची हुशारी कमी व्हावी. बहुतेक लोकांतून अशी कोणाची दशा झाली असती, तर ते मोलमजूरी करून उदरनिर्वाह करिते आणि स्वस्थ बसते; परंतु **मिल्टनानें** अंध असतां जो उद्योग केला, तेणेकरून केवळ आपलेंच नाव चिरकाळ राहीं असें केलें असें नाहीं; तर स्वदेशावर, स्वभाषेवर, आणि तो होऊन गेला त्या काळावर, त्याणे आपल्या कीर्त्तीचा प्रकाश पसरिला. अशीं दुसरीं उदाहरणें पुष्कळ देतां येतील; तें सर्व एकीकडे ठेवून लोक ओरड घालतात, "काय करावें? काल अनुकूल नाहीं; संधि सांपडत नाहीं;' उद्योग करण्यास साधनें नाहींत; यामुळें आमचानें कांहीं करवत नाहीं." करवत नाहीं! छिः!! असें ह्मणाल तर हा तुमचा दोष आहे. याविषयीं † **प्रोफेसर स्टुआर्ट** काय ह्मणतो तें ऐका;–

"जर कोणी पुरुषास व्यासंगाची वास्तविक प्रीति असेल, आणि ज्ञानसंपादनाविषयीं मनापासून आस्था असेल, तर विलक्षण रोग अथवा दुसऱ्या आपत्ति यांखेरीज त्यास विद्यार्थी होण्यास, आणि थोडीं बहुत तरी अभ्यासाचीं साधनें मिळविण्यास दुसरी कोणतीहि गोष्ट प्रतिबंध करूं शकणार नाहीं. जेव्हां लोक गाऱ्हाणें गातात, कीं आह्मास अभ्यासास वेळ नाहीं, अभ्यास करण्याचीं साधनें नाहींत, तेव्हां वास्तविक पाहूं गेलें असतां, त्यांचा उद्देश दुसरा असतो, अथवा त्यांस विद्यासंपादनाची हौस नसत्ये. कदाचित् असें होतें कीं जे अभ्यास करीत असतील, त्यांची हे

† ह्मणजे विद्यागुरु.

स्तुति करितात; आणि ह्मणतात काय हो अमुक अमुकाची केवढी हो विद्वत्ता! असें आश्चर्य करितात, परंतु स्वतः विषयीं ह्मटलें तर इतकें संपादन करायास आह्मास वेळ नाहीं व पैसा नाहीं असें ह्मणतात. अथवा आह्मा गरिबांला एवढें कशास पाहिजे असें ह्मणून, आपण महत्वाकांक्षी नाहीं असा आनंद मानून दिवस लोटितात. या सर्व प्रकारचा लोकांची सूक्ष्म रीतीने स्थिति पाहिली असतां, असें दृष्टीस पडतें, कीं संसाराची गोडी अथवा शुद्ध आळस हीं यांचा पोटीं असतात. जर यांमध्यें अधिक तेज व निग्रह असता, आणि सांप्रत भलतेंच करण्यामध्यें जो अमूल्य काळ घालवितात, तसें न करितां त्याचा सद्व्यय करिते, तर चारी दिशांचा संपत्ति आणून आपल्या अंकित करून ठेविते. असे जे पुरुष आहेत त्यांस मी सांगतों, कीं जो वेळ सांप्रत केवळ व्यर्थ दवडितां, त्याचा तत्पर होऊन सद्व्यय कराल, तर तीन चार वर्षांत **ग्रीक** व **हीब्रू** (ह्म० **युनानी** व **यहूदी**) भाषांचें तुह्मास बरेंच ज्ञान प्राप्त होईल. इकडे जंव एक पुरुष विवंचुना करीत असतो, कीं अमुक भाषा आपण शिकावी कीं नाहीं; तंव तिकडे दुसरा ती शिकूनहि बसतो. सतेजपणें आणि निग्रहाने विद्या संपादणें, आणि भीत भीत, कांकूं करीत आळसाने व्यासंग करणें, यांमध्यें इतकें अंतर आहे. अशा आळशी (ढकलाढकली करणाऱ्या) विद्यार्थ्यांची दुसरी ही अतिशय वाईट खोड असते, कीं जर तुह्मी त्यांशीं वाद करून त्यांचा निश्चय झाला कीं आपण करितों हें नीट नव्हे, तर तो निश्चय पुनः आळसाचें अथवा प्रपंचप्रीतीचें वारें आलें ह्मणजे उडून जातो. आळस आणि प्रपंचप्रीति हीं दोन पिशाचें मनाचा सर्व श-

कि निद्रित करितात. जो वडा पुरुष त्यांचें बोलणें ऐकतो, त्याची चाळीशी आली, तरी तिशीचीच योग्यता असत्ये. पन्नाशी होत्ये तंव उतार वय झालें; साठी आली ह्मणजे लोक बहुधा त्याची अवगणना करितात, आणि त्यालाहि मग मनुष्यांचा त्रास उत्पन्न होतो. दुर्दैवेंकरून सत्तर वर्षें-पर्यंत जर तो वांचला, तर बहुधा तो उत्तम लोकास गेला नाहीं, ह्मणून सर्वांस वाईट वाटूं लागण्याची संधि येत्ये."

जे लोक गरीबीचें अथवा वेळ नाहीं हें निमित्त सांगून अभ्यास करीत नाहींत, त्यांणी आपल्या देशांतील मागील विद्वानांचा कथा ऐकाव्या. ह्मणजे त्यांस केवढी अनुकूलता होती तें समजेल. मला **एल्फिनस्टन** विद्यालयांत एक ऐकिल्याचें पक्कें स्मरण आहे, तेवढीचा जरी विचार केला, तरी त्यांत विचारशीलांस शंभर पुस्तकें पाहिल्याचें श्रेय ये-ईल. ती अशी; व्याकरणशास्त्रामध्यें **सिद्धांतकौमुदी** पढल्यानंतर पुढें पढण्याचे टीकाग्रंथ आहेत. त्यांत **शे-खर** आणि **मनोरमा** हे दोन प्रख्यात आहेत. त्यांचा क-र्त्ता **नागोजी भट्ट** ह्मणून होता. तो कोणा गृहस्थाचे घरीं पाणक्या असे. त्यास सारा दिवस कष्ट केल्यानंतर रात्रौ अभ्यासास वेळ मिळे; परंतु घरची गरीबी यामुळें दिवा नाहीं, तर समयीं त्याणे सुकीं पानें जाळून त्या आगीचा उजेडानें पढावें, आणि ग्रंथ करावे. त्यास कांहीं अपत्य नव्हतें. त्याविषयीं खंती करून त्याची स्त्री ह्मणाली, कीं आपल्या पोटीं कांहीं संतान नाहीं. तेव्हां त्याणे तिला आपले दोन ग्रंथ देऊन सांगितलें, कीं हा मुलगा (**शेखर**) आणि ही मुलगी (**मनोरमा**) हीं आपलें नाव पुढें चालवि-तील. आणि खरोखरच तें त्याचें ह्मणणें खरें झालें. आतां

विचार करा, याला केवढी अनुकूलता होती! परंतु प्रपंच-प्रीति आणि आळस हीं पिशाचें याणे पराजित केलीं होतीं; तशीं जर तुह्मी कराल, तर तुह्मीहि तसे होऊं शकाल.

**५ आपल्यास अभ्यास चांगला होण्यास आणि त्याची उपस्थिति राहाण्यास असा मनोनिग्रह पाहिजे, तसें पुनः अवलोकन करण्याची सवय ठेविली पाहिजे.**

या कृत्यास स्मृति पाहिजे; ह्मणून सांप्रत तिचा व्यासंगामध्यें कसा उपयोग करावा याविषयीं कांहीं सांगतों. कांहीं विचार अथवा कांहीं विचारांची मालिका कधीं-कधीं इतकी मनांत भिनून जात्ये, कीं ती जरी किती केलें तरी मनांतून जात नाहीं. अथवा समयीं कांहीं गोष्ट विसरली असल्यास, तिची किती आठवण करूं जातां होत नाहीं; आणि जों जों आठवण करूं लागावें तों तों अधिकाधिक विसर पडतो. या गोष्टी पुष्कळ वेळ आपले अनुभवास येतात. याचें कारण असें आहे, कीं स्मृतीला स्वेच्छाचारित्व आवडतें, आणि तिजवर बलात्कार केला, तर ती ऐकत नाहीं. याकरितां स्मृति प्रखर करण्यास यत्न करावा; परंतु तिजवर प्रतिबंध ठेवून तिला बलहीन करूं नये. कारण ती आपले इच्छेने चालण्यास चाहात्ये. यास दृष्टांत; दुसऱ्याचें ऐकून लहान मुलें सहजवृत्त्या पुष्कळ पाठ करितात. जर कांहीं पाठ करायाचें असेल, तर तें एकदाच अतिशय घोकून लवकर पाठ होत नाहीं. असें करावें कीं प्रथम एकाग्र चित्त करून कांहीं वेळ घोकावें, तें मोठ्यानी घोकावें; ह्मणजे स्मृतीवर दोहीं इंद्रियानी संस्कार होतो.

एक पुस्तक पाहिल्याने नेत्रानी, व दुसरा कानानी. अशी एकदा संथा घेतली, ह्मणजे पुनः तसें करावें. असें वारंवार करावें. नंतर तोच पाठ पुस्तक एकीकडे ठेवून शाईकागद घेऊन लिहावा; तेणेकरून प्रत्येक वर्ण, अक्षर, व शब्द, हीं मनांत ठसून जातात. असें केलें असतां प्रथम अभ्यास हळु हळु होईल खरा; परंतु तो पुरा होईल. आणि मग पुढें नवीन व्यासंग करण्यास धैर्य येऊन, कितीहि कठीण विषय असला तरी अगदीं भीति वाटणार नाहीं.

जर **धातुरूपावलि** पाठ करूं लागलें, तर त्यांत एकसारिखीं क्रियापदांचीं रूपें येतात, त्या सादृश्यामुळें मन गोंधळून जातें. याचमुळें व्याकरणाचा पाठ शुष्क व कठीण लागतो. यास दृष्टांत. एके दिवशीं आपण एका जवाहिऱ्याचा दुकानांत गेलों, तेव्हां त्याणे आपल्यास वीस घड्याळें पांच हारीनीं ठेवलेलीं दाखविलीं आणि त्यांचीं नावें सांगीतलीं, पुनः दुसरे दिवशीं गेलों, तर तीं नावाप्रमाणें ओळखत नाहीं. तसें तीन चार दिवस केलें, तरी कांहीं उपयोग होत नाहीं. आतां असें नकरितां असें मनांत आणा, कीं आपण प्रथमचे दिवशीं चारच घड्याळें पाहिलीं; परंतु त्या सावकाराने त्यांतील भेदसुद्धां सर्व आपणास सांगीतले. प्रथमचें एक साधें घड्याळ असें सांगीतलें. दुसरें दाखविलें तें सनदी कमाणदार. तिसरें दाखविलें त्याची रचना अगदींच भिन्न. चवथें **क्रोनामिटर** (ह्म० उत्तम घड्याळ.) याप्रमाणें प्रत्येकाचे गुणधर्म सांगून त्यांची तुलना केली. नंतर दुसऱ्या दिवशीं त्यांचें पुनः अवलोकन करून दुसरीं चार पाहिलीं; याप्र-

माणें पाहिल्यानें सर्वांचीं नाव अवगत होऊन चांगली ओ-
ळख झाली. असें असतां पूर्वींचा रीतीनें गोंधळ मात्र
होऊन गेला होता. अशा रीतीनें अभ्यास केला असतां,
व्याकरण अथवा दुसरा कोणताहि विषय सुलभ रीतीनें सा-
ध्य होईल, स्मृति गोंधळून त्रासणार नाहीं, आणि जें जें पा-
हिजे तें तें ग्रहण करील.

*विट्‌न्‌ब्याक् ह्मणून एक महान् विद्वान् होता. तो आ-
पले विद्यार्थ्यांस सांगत असे, कीं– "पुनः अवलोकन अथवा
आवृत्ति करण्याचा पाठ ठेविल्यानें, तुमची गति किती वा-
ढेल, तें आज सांगायास् लागलें असतां, खरेंहि वाटणार नाहीं.
परंतु ती पुनरावृत्ति वास्तविक पुरी झाली पाहिजे. ह्मणजे त्याच
त्याच विषयाची पुनःपुनः घोकणी अथवा अवलोकन पाहिजे.
तें असें; प्रत्यहीं नवा पाठ घेण्यापूर्वीं कालचा पाठाचें अव-
लोकन केलें पाहिजे; तसेंच एक आठवडा झाल्यानंतर
त्या सर्व आठवड्यांत झालेल्या विषयाचें पुनः अवलोकन
पाहिजे. तसेंच एक महिना झाला, ह्मणजे संपूर्ण महि-
न्यांत जें शिकलें असेल, त्याची पुनरावृत्ति केली पाहिजे.
नंतर वर्षाचे सुटीमध्यें पूर्वींप्रमाणें झालेला सर्व विषय पुनः
पुनः अवलोकिला पाहिजे." हा महान् विद्वान् आपल्या
विद्यार्थ्यांस असें सांगत असे, कीं "जा रीतीनें तुह्मी मजज-
वळ शिकत असताना सवय ठेविली आहे, त्याप्रमाणें
तुह्मी शाळा सोडिल्यानंतर मागील अभ्यासाची पुनरावृत्ति
करण्याकडे प्रत्यहीं एक तास अथवा निदान घटिकाभर
तरी घालविण्याची सवय ठेवा. कारण जाची मनीषा अ-
सेल, त्याला तरूणपणीं जो आपण अभ्यास केला, त्याचा

*एक जर्मन्.

पुनरावलोकनार्थ प्रत्यहीं थोडासा तरी वेळ खर्च करण्यास सांपडेल, मग तो कोणताका धंदा करीना ?" ही गोष्ट खरी आहे, आणि याविषयीं **डाक्टर टाड्** ह्मणतो, कीं "जर प्रत्यहीं पाव तास पुनरावृत्तीकडे घालविला, तर आपला लहानपणाचा सर्व अभ्यास उपस्थित राहून, आपल्यास प्राचीन भाषाहि शिकायास सांपडतील. जो पुरुष अशी सवय पाडीत नाहीं, तो पुरा विद्वान् होईल ही आशा व्यर्थ आहे. असें करूं लागलें असतां प्रथम कंटाळा येईल, परंतु तो काय तो आरंभींच. *'**कझेनोफन**कृत स्मरणार्ह कृत्यें' हें पुस्तक मी वाचीत असतां असा नियम ठेविला होता, कीं पुढील भाग वाचण्यापूर्वी पूर्वीचाची आवृत्ति करावयाची, तसेंच मागलें प्रकरण अथवा पुस्तक पुनः पाहिल्याशिवाय पुढीलास आरंभ करायाचा नाहीं. याप्रमाणें सर्व ग्रंथ संपल्यावर पुनः तो ग्रंथ साद्यंत वाचिला. असे श्रम करण्यास मला जवळजवळ तीन महिने लागले, परंतु त्यापासून माझें फार हित झालें. पुनरावृत्तीपासून असें होऊं लागलें, कीं दोन वेळा वाचलेला भाग अथवा प्रकरण संपवून, मी जेव्हां नवीन भाग अथवा प्रकरण वाचूं लागें, तेव्हां माझ्यामध्यें जशी कांहीं प्रेरणाशक्ति उत्पन्न होई, तेणेंकरून मला कांहीं कठीण लागतच नसे. याविषयीं **सिसरोची** † अशी उपमोक्ति आहे, कीं खलाशी वल्हीं मारूं लागले ह्मणजे ते वल्हीं मारिताना थांबल्यावरहि नावेला जी प्रथम गति प्राप्त होत्ये, त्या प्रेरणेनेच ती स्वतः चालत असत्ये; याच प्रमाणें माझें होई."

आतां पाहूं गेलें असतां बहुत लोकांचें आचरण याहून

* एक युनानी पंडित.

† एक **रोमन** वक्ता.

किती भिन्न असतें. जा विद्याप्रदेशांतून ते जातात तो निबिड धुक्याने वेष्टित होऊन जातो. मागें पाहातात तों मार्ग दिसत नाहीं. जीं सपाट तळवटें टाकून गेले, तीं अरण्यवत् भासतात. जा नद्या उतरून गेले त्यांचीं परत उतरावयाचीं ठिकाणें चुकून चांचपूं लागतात तों जिकडे तिकडे खोल पाणी. मागें फिरल्यास अशी व्यवस्था; मग पुढें तर गोंधळूनच जातात. पाहातात तों सर्व वातावरण गुंग झालें; दिशा धुंद झाल्या; वाटा लांबशा दिसूं लागल्या; आणि आपण कोठें जात आहों याची पदोपदीं शंका येऊं लागली. अशा संकटांत कोणी मार्ग चालूं शकेल, परंतु त्यापासून त्यास सुख होणार नाहीं, आणि वाटेची बराबर माहिती नसल्यामुळें, खाणखुणाविषयीं त्यास कांहींच स्मृति राहाणार नाहीं.

६ अभ्यास करीत असतां, थकल्यामुळें मनास विश्रांति आणण्याकरितां अगदींच अभ्यास टाकून नदेतां दुसरा अभ्यास करून मनोरंजन करावें.

एकाच विषयाचा अभ्यास करण्याकडे, अथवा एकाच गोष्टीचा विचार करण्यामध्यें, बराच वेळपर्यंत लक्ष योजणें हें थोडक्यांचा हातून होतें; आणि असें न झाल्यामुळें कंटाळा आला ह्मणजे बहुतेक लोक आपला अभ्यास सोडून कांहीं वेळ मुळींच रिकामे बसतात. यास दृष्टांत; असें मनांत आणा, कीं आपण **माघ** काव्य पढत आहों; परंतु एक दोन तास अवलोकन करितां करितां कंटाळा आला; तेव्हां पुस्तक एकीकडे ठेवून, जरासें स्वस्थ बसावेंसें वाटलें, तेंच बसतांच आळसाने आळस वाढून आणखी बसणें झालें. अशा कृतीने जितका वेळ अभ्यासाखालीं गेला

होता, तितकाच वेळ रिकामा घालविला. आतां हा वेळ बहुधा अगदीं व्यर्थ गेला, अथवा याचें तादृश सार्थक्य तरी झालें नाहीं. आतां जसें रिकामें बसल्यानें अथवा निरुद्योगीपणानें मनास विश्रांति होये, तशीच अन्य उद्योग केल्या पासूनहि होये. या गोष्टीचा जर आपण विचार करून विसर पडूं दिला नाहीं, तर आपला वेळ व्यर्थ जाणार नाहीं. जसें, जर **माघ** शिकत असतां कंटाळा आला, तर **बीज** काढावें; अथवा त्याचाहि त्रास उत्पन्न झाला, तर **पदार्थविज्ञान** शास्त्राचें पुस्तक काढून तो पाठ पाहावा; अथवा इतिहासाची पुनरावृत्ति करावी; अथवा निबंधाचे विषयाचें उद्घाटन करावें. अशा अनेक रीतींनी जो काल सांप्रत अगदीं व्यर्थ जातो, तो सांचवून त्याचा सद्व्यय करावा.

**डाक्टर टाड** ह्मणतो, कीं पूर्वीं आमचे पूर्वज करीत आणि हलींचे **जर्मन** लोक १६ तास प्रत्यहीं अभ्यास करितात. असें कसें ते करीत असतील असें आपल्यास आश्चर्य वाटेल, तर मला वाटतें कीं या गोष्टींत कांहींच आश्चर्यकारक नाहीं. एक अभ्यास करीत असतां मन थकून गेलें, तर दुसरा विषय हातीं घ्यावा, तेणेंकरून मन आराम पावून, पूर्ववतप्रमाणें चंचल होतें. असें जर नसतें तर वर लिहिल्याप्रमाणें फार वेळ अभ्यास झाला नसता. कांहीं लोकांचा पुष्कळ वेळ फुकट जातो, कोणाचा मुळींच जात नाहीं याचें कारण हेंच आहे. वरील रीतीनें जे अभ्यास करितात, तेच मोठीं कृत्यें करितात. याच कारणामुळें एक पुरुष निरनिराळीं कामें करितो, तीं एकमेकांपासून अगदीं भिन्न दिसत असतांहि तो सर्व बराबर चालवितो. कारण

वरील रीतीनें उद्योग करीत असल्यामुळें, तो सर्व काल उद्योगाहि करीत असतो व विश्रांतिहि घेत असतो.

**डाक्टर गूड** याविषयीं **डाक्टर टाड** याणे असें लिहिलें आहे, कीं त्याला सतत काळजी लावून आपल्या कठीण धंद्याचें काम करावें लागत असतां, चाळीस वर्षांचा होण्यापूर्वीं त्याणें निबंध लिहून बक्षिसें मिळविलीं; हा अकरा भाषा तर पुऱ्या शिकला; आणि एक सर्वविषयसंग्रक कोश करण्यास सहायभूत झाला; याणे आपला 'वैद्यकाभ्यास' ह्मणून प्रख्यात ग्रंथ लिहिला आणि शिवाय काव्यें रचीत व भाषांतर करीत असे. 'सृष्टिवर्णन' नामक जो त्याणे ग्रंथ लिहिला आहे त्यावरून त्याचा ज्ञानाचा बहुविधा रूपाची आणि पक्केपणाची कांहींशी खातरी होत्ये. असे नाना प्रकारचे धंद्यांमुळें अथवा काम फार यामुळें न गोंधळतां, एकदम सर्व कामें सारखीं चालवी, आणि अर्धवट टाकीत नसे. हें काम थोडेंसें कर, दुसऱ्यास हात घाल, तिसऱ्यास आरंभ कर, असें करणें नीट नाहीं असें ह्मणतात, तें नीट नव्हे. कारण अशीं कामें करीत असल्याने मनास उद्योग लागतो, आणि वृथा मनोरथ करीत बसण्याची सवय मोडत्ये. कारण तसे मनोरथ रचण्यास अवकाशच सांपडत नाहीं; त्यामुळें असे निरनिराळे उद्योग केल्याने प्रत्यक्ष फायदा नझाला, तरी मनामध्यें भलत्याच कल्पना येऊन, तें स्वच्छंदी होऊन वाउगें जात नाहीं हा मोठा लाभ होतो.

मित्र हो! वरील निबंधांत ह्या अभ्यासाविषयीं कांहीं विचार सांगण्याविषयीं यत्न केला आहे, त्याप्रमाणें फल सिद्ध होण्यास तदनुसार आचार झाला पाहिजे. याविष-

यीं तुकाराम ह्मणून एक साधु होऊन गेला त्याचें असें वचन आहे, कीं--

"बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाउलें".

तात्पर्य केवळ वाग्जल्पना करून सार्थक्य नाहीं. त्याप्रमाणें कृति झाली पाहिजे. पाहा, कोणतीहि गोष्ट करणें ती स्वहितावर दृष्टि ठेवून तर सर्व करीत असतात; परंतु वास्तविक स्वहित हें पराचें हित केल्यापासूनहि होतें. ह्मणजे केवळ स्वहितावर जरी दृष्टि ठेविली, तरी परंपरासंबंधाने परोपकारापासून आपलें हितच होतें. याविषयीं एका कवीने ह्मटलें आहे,--

"परोपकाराय वहंति नद्यः
परोपकाराय फलंति वृक्षाः
परोपकाराय दुहंति गावः
परोपकाराय भवंति साधवः"॥ १॥

एथे साधु शब्देंकरून उत्तम पुरुष असा अर्थ घ्यावयाचा. बहुधा शब्दपांडित्यावर कोणाची दृष्टि असून, चांगले शब्द नसल्यामुळें वस्तूचा अव्हेर करितात. याकरितां मला एथे इतकें प्रतिपादन करावें लागलें. आतां मित्रहो! पूर्वीं अभ्यास शब्दाचा अर्थ म्या सांगून आपण सर्व अभ्यासी आहों याचें प्रतिपादन केलें. आणि विचारासारिखा आचार असावा अशी सांप्रत तुह्मास विनंति करितों. याचें कारण एतद्देशीय लोकांस शिकविल्यापासून व्हावा तसा परिणाम झाला नाहीं; आणि आपले लोकांस जरी सर्व वस्तु अनुकूल नाहींत, ह्मणून असें जे बोलणारे त्यांचे सर्व दूषणांस आह्मी पात्र नाहीं, अशी जरी तुह्मास पळायास वाट आहे; तरी मी अशी आशा करितों, कीं अशी अडचणीची वाट सोडून, तुह्मी राजमार्ग धरावा आणि अभ्या-

?त श्रम करून अभ्यास करावा; असा कीं त्याचीं फळें का-ळांतरीं राहातील. असें केलें असतां, जें हल्लीं तुह्मास दूषण होत आहे, तें उलटें अधिक शोभा देणारें भूषण होईल.

मित्रहो! विचार करा, कीं म्या जा **नागोजी भट्टाचा** वृत्तांत कथिला, त्याणें शुद्ध मनोनिग्रहानें पाहा केवढें कर्म केलें! असेंच जर आपणांतून प्रत्येक करितील, तर त्यासारिखे आपण कां होऊं नये? पाहा, त्याला काय अनुकूलता होती? मला वाटतें त्यासारिखी प्रतिकूलता या समजामध्यें थोड्यांसच असेल. पूर्वीं आपले देशांतील लोक विद्वान् होत, तसे आपण होणार नाहीं काय? जरी बुद्धि कमी असेल, तथापि उद्योग कां सोडावा? पहा "**जीवस्यतत्वजिज्ञासा**" ह्मणजे मनुष्याचें काम तत्व जाणावयाची इच्छा हें आहे. तेव्हां तद्विषयीं उद्योग करून आपण नाना प्रकारचें ज्ञान संपादून परोपकार करायास मागें कां हटावें?

मित्रहो, आपल्यामध्यें स्वस्थ बसून गोष्टी सांगण्याची आणि निरर्थक वेळ घालविण्याची दुष्ट सवय पडून गेली आहे. ही जरी व्यभिचारादि दुष्ट चालींपेक्षां वरून पाहिलें असतां निरुपद्रवी चाल दिसते, तरी ही सर्व दुर्गुणांची माता आहे. हिचा आळसाशीं समागम होऊन, जी प्रजा उत्पन्न झाली आहे, तिणें आपला देश उद्वस्त करून टाकिला आहे. आतां उद्योग व अभ्यासरूप खड्ग धरून, जर तुह्मी तिचा शिरच्छेद नकराल, तर ती तुमचा सर्वस्वापहार करील.

यासाठीं तुह्मी निरंतर अभ्यास करून आपल्या देशाचें कल्याण कराल अशी अशा करितों.

**समाप्त.**